दादा भगवान प्ररूपित

# पाप-पुण्य

मनुष्यगती

देवगती











नरकगती

तिर्यंचगती

Marathi

दादा भगवान कथित

# पाप-पुण्य

मूळ गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन
मराठी अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : **अजीत सी. पटेल**
**दादा भगवान विज्ञान फाउन्डेशन,**
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर, नवरंगपुरा,
अहमदाबाद - 380009, Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2100, +91 9328661166/77



**प्रथम आवृत्ति** : 3000 प्रती ऑक्टोबर, 2015
**नवीन रीप्रिंट** : 2000 प्रती जानेवारी, 2025

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 40 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
एच.बी.कापडिया न्यू हाइस्कूलच्या समोर,
छत्राल-प्रतापपुरा रोड, छत्राल,
ता. कलोल, जि. गांधीनगर-382729, गुजरात
**फोन :** +91 79 3500 2142

**ISBN/eISBN :** 978-93-86289-88-9

**Printed in India**

# त्रिमंत्र







नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो ऊवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नम: शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद



## दादा भगवान कोण?

जून 1958 संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवित आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञाना संबंधीत जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषायांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये विशेष लक्ष ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रूटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानार्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण लिहिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.



# संपादकीय

आपल्या भारतात पाप-पुण्याची समज बाळाला अगदी त्याच्या बालपणापासूनच दिली जाते. छोटे बाळ एखाद्या जीवजंतूला मारत असेल, तर आई पटकन त्याच्या हातावर मारते आणि ओरडून सांगते की, 'मारायचे नाही, पाप लागेल!' बालपणापासूनच मुलांना ऐकायला मिळते की चुकीचे केले तर पाप लागेल, असे करू नये. बऱ्याच वेळा मनुष्याला दुःख येते, तेव्हा तो रडतो, आणि म्हणतो माझ्या कोणत्या जन्माच्या पापांची शिक्षा मी भोगत आहे. चांगले झाले तर म्हणतात, 'पुण्यशाली आहे.' म्हणजे पाप-पुण्य या शब्दांचा उपयोग आपल्या व्यवहारात सतत होत असतो.

भारतातच काय तर विश्वातील सर्व लोक पुण्य-पाप याला स्वीकारतात.आणि त्याच्यातून कशाप्रकारे सुटावे यासाठी उपायही सांगितले गेले आहेत.

परंतु पुण्य-पापाची यथार्थ व्याख्या काय? यथार्थ समज काय आहे? पूर्वजन्म, हा जन्म आणि पुढील जन्म, याचा पाप-पुण्याशी काय संबंध आहे? जीवन व्यवहारात पाप-पुण्याची फळे कशाप्रकारे भोगावी लागतात? पुण्य आणि पापाचे प्रकार काय असतात? तेथून थेट मोक्षमार्गात पाप-पुण्य उपयोगी आहेत का? मोक्षप्राप्तीसाठी पाप-पुण्य दोन्हींची आवश्यकता आहे, की मग दोन्हींपासून मुक्त व्हावे लागेल?

पुण्य-पापाच्या एवढ्या साऱ्या गोष्टी ऐकायला मिळतात पण त्यात खरे काय आहे? याचे समाधान कुठे मिळेल? पाप-पुण्याची यथार्थ समज नसल्यामुळे खूप प्रश्न उभे राहतात. पुण्य आणि पापाची व्याख्या कुठेही क्लियरकट आणि शॉर्टकट (स्पष्ट आणि संक्षिप्त) मध्ये बघायला मिळत नाही. म्हणूनच पुण्य-पापाच्या वेगवेगळ्या व्याख्या सामान्य माणसाला गोंधळून टाकतात आणि शेवटी पुण्य करणे आणि पाप करण्यापासून थांबणे असे तर कधी घडतच नाही.

परम पूज्य दादाश्रींनी ती व्याख्या खूपच सरळ, साध्या आणि

सुंदर पद्धतीने सांगितली आहे की, 'दुसऱ्यांना सुख दिल्याने पुण्य बांधले जाते आणि दुसऱ्यांना दु:ख दिल्याने पाप बांधले जाते.' आता इतकीच जागृती जर पूर्ण दिवस ठेवली तर त्यातच संपूर्ण धर्म सामावला आणि अधर्म सुटला!

आणि चुकूनही कोणाला दु:ख दिले गेले तर त्याचे लगेचच प्रतिक्रमण करून घ्या. प्रतिक्रमण म्हणजे ज्या व्यक्तीला वाणीने, वर्तनाने किंवा मनानेही दु:ख दिले असेल तर लगेचच त्या व्यक्तीच्या आत विराजमान आत्म्याजवळ, शुद्धात्म्याजवळ माफी मागावी, हृदयापासून पश्चाताप व्हायला हवा आणि पुन्हा असे करणार नाही, असा दृढ निश्चय करायला हवा. एवढेच,बस. आणि तेही मनातच, परंतु मनापासून करा, तरच त्याचे एक्झॅट (यथार्थ) फळ मिळेल.

परम पूज्य दादाश्री म्हणतात, 'जीवन पुण्य आणि पापाच्या उदयानुसार चालते, दुसरा कोणी चालविणारा नाही. तेव्हा मग, कोणाला दोष किंवा शाबासकी द्यायची राहिलीच कुठे? म्हणूनच पापाचा उदय असेल तेव्हा अधिक प्रयत्न न करता शांत बसून रहा आणि आत्म्याचे कर. पुण्य जर फळ देण्यासाठी समोर आले असेल तर शेकडो प्रयत्न कशासाठी? आणि पुण्य जर फळ देण्यासाठी सन्मुख आले नसेल तर शेकडो प्रयत्न कशासाठी? म्हणून तू धर्म कर.

पुण्य-पापासंबंधी सामान्य प्रश्नांपासून ते सुक्ष्मातिसूक्ष्म प्रश्नांचीही तितकीच सरळ, संक्षिप्त आणि पूर्ण समाधानकारक उत्तरे येथे मिळतात,परम पूज्य दादाश्रींच्या आपल्या देशी शैलीमध्ये! मोक्षप्राप्तीसाठी पुण्याची आवश्यकता आहे का? जर आवश्यकता असेल तर त्यासाठी कोणते आणि कसे पुण्य पाहिजे?

पुण्य तर पाहिजेच परंतु पुण्यानुबंधी पुण्य पाहिजे. इतकेच नव्हे, तर मोक्षाच्या हेतूसहित पुण्य बांधलेले असावे. ज्यामुळे त्या पुण्याच्या फळस्वरूप मोक्ष प्राप्तीची सर्व साधने आणि अंतिम साधन अर्थात आत्मज्ञानी भेटतील. शिवाय पुण्यानुबंधी पुण्य मोक्षाच्या हेतूसाठी बांधलेले असेल तर त्याचबरोबर (1) क्रोध-मान-माया-लोभ कमी झालेले

पाहिजेत, कषाय मंद झालेले पाहिजेत. (2) स्वत:जवळ जे आहे ते दुसऱ्यांसाठी लूटवून टाकावेत आणि (3) प्रत्येक क्रियेमागे मोबदल्याची इच्छा नसेल तरच ते पुण्य मोक्षासाठी कामी येईल. अन्यथा दुसरे पुण्य तर भौतिक सुख देऊन बर्फासारखे वितळून जाईल.

अशी पाप-पुण्याची यथार्थ समज तर ज्ञानी पुरुषांकडूनच सत्संग प्रश्नोत्तरी द्वारे प्राप्त झालेली आहे, त्याचीच प्रस्तुती या संकलनात केली आहे.

– **डॉ. नीरूबहन अमीन**

# पाप-पुण्य

## पाप-पुण्याची अशी व्याख्या कुठेही मिळणार नाही

**प्रश्नकर्ता :** पाप आणि पुण्य हे काय आहे?

**दादाश्री :** पाप आणि पुण्य याचा अर्थ काय आहे? काय केले तर पुण्य मिळेल? पुण्य-पापाचे उत्पादन कुठून होते? तर 'हे जग जसे आहे तसे लोकांनी जाणले नाही, म्हणून स्वत:ला जसे ठीक वाटेल तसे वागतात. म्हणजेच कोणा जीवाला मारतात, कोणाला दु:ख देतात, कोणाला त्रास देतात.'

कोणत्याही जीवाला कुठल्याही प्रकारे त्रास देणे किंवा दु:ख देणे, यामुळे पाप बांधले जाते. कारण गॉड इज इन एव्हरी क्रियेचर, वेदर विजिबल ओर इन्विजिबल (डोळ्यांनी दिसणाऱ्या किंवा न दिसणाऱ्या प्रत्येक जीवमात्रात परमात्मा आहे.) या जगातील सर्व लोक, प्रत्येक जीवमात्र भगवंत स्वरूपच आहे. झाडातसुद्धा जीव आहे. तसे तर लोक तोंडाने बोलतात खरे की, सगळ्यांच्यात परमात्मा आहे, पण खरोखर ते त्यांच्या श्रद्धेत नाही. म्हणून झाडे कापतात, विनाकारण पाने तोडत राहतात, म्हणजे सगळे नुकसानच करतात. कोणाही जीवमात्राला कोणत्याही प्रकारे नुकसान पोहोचवणे, यामुळे पाप बांधले जाते आणि कोणत्याही जीवाला कोणत्याही प्रकारे सुख देणे, यामुळे पुण्य बांधले जाते. तुम्ही बागेत पाणी शिंपडता तेव्हा जीवांना सुख मिळते की दु:ख? म्हणजे तुम्ही सुख देता, त्यामुळे पुण्य बांधले जाते. बस, इतकेच समजायचे आहे.

संपूर्ण जगातील जे धर्म आहेत, त्यांना जर सार रूपाने सांगायचे असेल तर आम्ही एकच गोष्ट सर्वांना समजावतो की, जर तुम्हाला

सुख हवे असेल तर दुसऱ्या जीवांना सुख द्या आणि दु:ख हवे असेल तर दु:ख द्या. तुम्हाला जे अनुकूल वाटत असेल ते करा, यालाच म्हणतात पुण्य आणि पाप. सुख हवे असेल तर सुख द्या, त्याने क्रेडीट जमा होईल आणि दु:ख हवे असेल तर दु:ख द्या, त्याने डेबिट जमा होईल. त्याचे फळ मग तुम्हाला चाखावे लागेल.

## चांगले-वाईट, पाप-पुण्याच्या आधारावर

कधी तरी चांगले संयोग जुळून येतात का?

**प्रश्नकर्ता :** चांगले पण येतात.

**दादाश्री :** त्या चांगल्या आणि वाईट संयोगांना कोण पाठवित असेल? आपल्याच पुण्य आणि पापाच्या आधारावर संयोग जुळतात. असे आहे की, या जगाला चालविणारा कोणी नाही. जर कोणी चालविणारा असता तर मग पाप-पुण्याची गरजच नाही.

**प्रश्नकर्ता :** या जगाला चालविणारा कोण आहे?

**दादाश्री :** पुण्य आणि पापाचे परिणाम. पुण्य आणि पापाच्या परिणामाने हे जग चालत आहे. कोणी देव चालवत नाही. कोणी यात हस्तक्षेप करत नाही.

## पुण्य प्राप्तीच्या पायऱ्या!

**प्रश्नकर्ता :** पुण्ये अनेक प्रकारची आहेत, तर कोण-कोणत्या प्रकारचे कार्य केले तर पुण्य किंवा पाप म्हटले जाईल?

**दादाश्री :** जीवमात्राला सुख देणे, आणि त्यातही फर्स्ट प्रेफरन्स (प्रथम महत्व) मनुष्यांना. मनुष्यांचे झाले की मग दुसरा प्रेफरन्स पंचेंद्रिय जीवांना. तिसऱ्या प्रेफरन्समध्ये चार इंद्रिय, तीन इंद्रिय, दोन इंद्रिय, एक इंद्रिय जीव, अशा प्रकारे त्यांना सुख देणे, ह्यामुळेच पुण्य बांधले जाते आणि त्यांना दु:ख दिल्याने पाप बांधले जाते.

**प्रश्नकर्ता :** ज्यांना भौतिक सुखे मिळतात, त्यांनी कुठल्या प्रकारची कर्मे केलीली असतील म्हणून ती मिळतात?

**दादाश्री :** जर कोणी दु:खी असेल तर त्याला सुख दिल्याने पुण्य मिळते आणि परिणामी तसे सुख आपल्यालाही मिळते. कोणाला दु:ख दिले तर तुम्हाला दु:ख मिळते. तुम्हाला जे आवडत असेल ते तुम्ही द्या.

पुण्याचे दोन प्रकार आहेत : एका प्रकारच्या पुण्याने भौतिक सुखे मिळतात आणि दुसरे एक अशा प्रकारचे पुण्य आहे की, जे आपल्याला 'खरे स्वातंत्र्य' प्राप्त करविते.

## ती दोन्ही मानली जातात कर्मेच!

**प्रश्नकर्ता :** पाप आणि कर्म हे दोन्ही एकच आहेत, की वेगवेगळे?

**दादाश्री :** पुण्य आणि पाप दोन्हीही कर्मेच म्हटली जातात. परंतु पुण्याचे कर्म दु:ख देत नाही आणि पापाचे कर्म आपल्या धारणेनुसार होऊ देत नाही, दु:ख देते.

जोपर्यंत अशी मान्यता आहे की, 'मी चंदुलाल आहे' (वाचकांनी चंदुलालच्या जागी स्वत:चे नाव समजावे) तोपर्यंत कर्मे बांधलीच जातात. दोन प्रकारची कर्मे बांधली जातात, पुण्य केले तर सद्‌भावनेचे कर्म बांधतो आणि पाप केले तर दुर्भावनेचे कर्म बांधतो. जोपर्यंत हे हक्काचे आणि हे बिनहक्काचे असे विभाजन होत नाही, तोपर्यंत लोकांचे पाहून तोही उलटेच शिकतो. मनात वेगळे असते, वाणीने काही वेगळेच बोलतो आणि वर्तनात तर अगदी वेगळेच असते. त्यामुळे नुसती पापेच बांधली जातात. म्हणजे सध्या लोकांना पापाचीच कमाई होत आहे.

## पुण्य-पाप, तो व्यवहार धर्म

**प्रश्नकर्ता :** मग पुण्य आणि धर्म यात काय फरक आहे?

**दादाश्री :** पुण्य हा तर व्यवहार धर्म आहे, खरा धर्म नाही. व्यवहार धर्म म्हणजे स्वत: सुखी होण्यासाठी. पुण्य अर्थात क्रेडीट. ज्यामुळे आपण सुखी होऊ शकतो, क्रेडीट असेल तर आपण निवांतपणे राहू शकतो आणि तेव्हाच चांगल्या प्रकारे धर्म होऊ शकतो. आणि

पाप म्हणजे डेबिट. पुण्य नसेल, क्रेडीट नसेल, तर आपण धर्म कसे करणार? क्रेडीट असेल तर एका बाजूने शांती राहते, म्हणून आम्ही धर्म करू शकू.

**प्रश्नकर्ता :** कोणते कर्म केल्याने पुण्य होते आणि कोणते कर्म केल्याने धर्म होतो?

**दादाश्री :** हे सगळे जीव, मनुष्ये, झाड–पाने गायी–म्हशी, पशु–पक्षी, जलचर हे सर्व जीव सुख शोधत असतात. दुःख कोणालाही आवडत नाही. म्हणून तुमच्याजवळ जे सुख आहे, ते तुम्ही इतरांना दिले तर तुमच्या खात्यात क्रेडीट जमा होते, पुण्य बांधले जाते. दुसऱ्यांना दुःख दिले तर पाप बांधले जाते.

**प्रश्नकर्ता :** तर मग धर्म कशाला म्हणतात?

**दादाश्री :** धर्म म्हणजे आत्मधर्म. आत्म्याचा स्वतःचा धर्म. पाप आणि पुण्य दोन्हीही अहंकाराचे धर्म आहेत. अहंकार असेल तोपर्यंत पाप आणि पुण्य होतात. अहंकार गेला की पाप आणि पुण्य जातात, तेव्हा आत्मधर्म होतो. आत्म्याला जाणावे लागेल, तेव्हाच आत्मधर्म होईल.

## पुण्य–पापाहून वेगळा, रियल धर्म

रिलेटिव्ह धर्म काय म्हणतात? चांगले करा आणि वाईट करू नका. चांगले केल्यामुळे पुण्य बांधले जाते आणि वाईट केल्यामुळे पाप बांधले जाते.

संपूर्ण जीवनाचे वहीखाते फक्त पुण्याने भरता येत नाही. कोणाला शिवी दिली तर पाच रुपये उधारी आणि धर्म केला तर शंभर रुपये जमा होतात. पाप–पुण्याची वजा–बेरीज होत नाही. जर असे असते तर या करोडपतींनी पाप जमा होऊच दिले नसते. पैसा खर्च करून उधारी उडवून टाकली असती. परंतु हा तर खरा न्याय आहे. याच्यात तर ज्यावेळी ज्याचा उदय होतो, तेव्हा ते सहन करावेच लागते. पुण्याने सुख मिळते आणि पापाच्या फळाचा उदय आला तर दुःख सहन करावे लागते, फळे तर दोन्हीही चाखावीच लागतात.

भगवंत काय म्हणतात, तुला जे फळ चाखायला आवडत असेल त्याचे बी तू पेर. सुख आवडत असेल तर पुण्याचे आणि दुःख आवडत असेल तर पापाचे बी पेर, पण दोन्ही रिलेटिव्ह धर्म आहेत, रियल नाही.

रियल धर्मात, आत्मधर्मात तर पुण्य आणि पाप दोन्हींपासून मुक्ती पाहिजे. रिलेटिव्ह धर्माने भौतिक सुखे मिळतात आणि मोक्षमार्गाकडे प्रयाण होते, आणि रियल धर्माने मोक्ष मिळतो. इथे 'आमच्या' जवळ रियल धर्म आहे, त्याने सरळ मोक्षच मिळतो. इथेच मोक्ष सुख अनुभवता येते. इथेच आधी, व्याधी, उपाधीपासून मुक्ती मिळते आणि निरंतर समाधी राहते. निराकूलता उत्पन्न होते, इथे तर आत्मा आणि परमात्म्या याच्याच गोष्टी होतात.

## परमाणू स्वतःच फळ देतात सुख-दुःख रूपात

**प्रश्नकर्ता :** पाप आणि पुण्य याचे विभाग कोणी केले?

**दादाश्री :** कोणीच केले नाही.

**प्रश्नकर्ता :** हे पाप आहे, हे पुण्य आहे हे सर्व बुद्धी सांगते, आत्म्याला तर पाप-पुण्य असे काही नसतेच ना?

**दादाश्री :** नाही, आत्म्याला नसते. आपण जेव्हा समोरच्याला दुःख होईल अशी वाणी बोललो तेव्हा ती वाणीच स्वतःच परमाणूंना खेचते. त्या परमाणूंना दुःखाचा रंग लागतो, नंतर ते परमाणू जेव्हा फळ देतात, तेव्हा ते दुःखच देतात, यात इतर कोणाची ढवळाढवळ नसतेच.

## यात जबाबदारी कोणाची?

**प्रश्नकर्ता :** एका व्यक्तीजवळ पैसा आहे, तर एका व्यक्तीजवळ गरिबी आहे, हे कशामुळे? सगळ्यांनी मनुष्य जन्म घेतला आहे, तरीही?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की आपला हा जो जन्म होतो, तो इफेक्ट असतो, इफेक्ट म्हणजे मागील जन्मी जे कॉजेस टाकले होते, त्याचे हे फळ आहे. म्हणजे जितके पुण्य असेल, त्या पुण्यामुळे काय

काय घडत असते? तर त्यात सर्व संयोग चांगले मिळाले तर मदतच करत राहतात. बंगला बांधायचा असेल तर बंगला बांधू शकतो, मोटार मिळते! आणि पाप खराब संयोग घेऊन येते आणि बंगल्याचा लिलाव करविते. अर्थात हे आपल्याच कर्माचे फळ आहे. त्यात भगवंताची ढवळाढवळ नाही! यू आर हॉल ॲन्ड सॉल रिस्पॉन्सिबल फॉर युअर लाइफ! एक लाइफ नाही, तर कितीतरी लाइफसाठी भगवंताचा यात हस्तेक्षप नाही. विनाकारण लोक भगवंताच्या मागे लागले आहेत.

## प्रकार : पुण्य-पापाचे

जगामध्ये आत्मा आणि परमाणू अशा दोनच गोष्टी आहेत. कोणाला शांती दिली असेल, सुख दिले असेल तर पुण्याचे परमाणू गोळा होतात आणि कोणाला दु:ख दिले असेल तर पापाचे परमाणू गोळा होतात. मग तेच चावतात (त्रास देतात). इच्छेनुसार घडते ते पुण्य आणि इच्छेविरुद्ध घडते ते पाप. पापे दोन प्रकारची आहेत. एक पापानुबंधी पाप, दुसरे पुण्यानुबंधी पाप. पुण्याचे दोन प्रकार आहेत, एक पापानुबंधी पुण्य, दुसरे पुण्यानुबंधी पुण्य.

## पापानुबंधी पाप

पापानुबंधी पाप म्हणजे आता पाप भोगत आहे आणि परत पापाचे नवीन अनुबंध बांधत आहे. कोणाला दु:ख देतो आणि मग खुशही होतो.

## पुण्यानुबंधी पाप

पुण्यानुबंधी पाप अर्थात पूर्वी झालेल्या पापामुळे आता दु:ख (पाप) भोगत आहे परंतु नीतीने आणि चांगल्या संस्कारांमुळे अनुबंध पुण्याचे बांधतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दु:ख उपकारी आहे ना?

**दादाश्री :** नाही, ज्याला 'मी शुद्धात्मा आहे' असे भान झालेले आहे त्याच्यासाठी दु:ख उपकारी आहे, नाही तर दु:खातून दु:खच जन्माला येते. दु:खात भाव तर दु:खाचेच येतात. या काळात पुण्यानुबंधी पापवाले जीव कमी आहेत. आहेत मात्र नक्की पण त्यांनाही दूषमकाळ

नडतो. कारण हे पाप नडत आहे. पाप म्हणजे काय? तर संसार व्यवहार चालविण्यात अडचणी येतात त्याला पाप म्हटले जाते. बँकेत पैसे वाढविण्याची गोष्ट तर दूरच राहिली पण इथे रोजचा व्यवहार चालविण्यासाठी सुद्धा काही ना काही अडचणी येतच राहतात. ह्या सर्व अडचणी येतात पण तरीही तो मंदिरात जातो, विचारही धर्माचे येतात, यालाच पुण्यानुबंधी पाप म्हणतात. पुण्य बांधले जाते पण हा दूषमकाळ असा आहे ना की या पापामुळे जरा अडचणी येतात, त्यामुळे खरोखर जसे हवे तसे पुण्य बांधता येत नाही. हल्ली तर संसर्ग लागतोच ना! मंदिराबाहेर चपला काढल्या असतील तर दुसऱ्याला विचारतो की, का भाऊ, चपला इथे का काढल्या? त्यावर तो सांगतो, त्या बाजूने चपला चोरीला जातात, म्हणून इथे काढल्या. तेव्हा आपल्या मनातही विचार येतो की, तिथून तर चपला चोरीला जातात, त्यामुळे मग दर्शन करते वेळीही चित्त एकाग्र होत नाही.

## पापानुबंधी पुण्य

पूर्वी केलेल्या पुण्यामुळे आज सुख उपभोगतो, परंतु उपभोग घेताना भयंकर पापाचे अनुबंध बांधतो. सध्या सगळीकडे पापानुबंधी पुण्य आहे. एखाद्या शेठचा असा छान बंगला असेल तरीही तो बंगल्यात सुखाने राहू शकत नाही. शेठ दिवसभर पैशांसाठी बाहेरच असतो. आणि शेठानी मोह बाजारात सुंदर साड्यांच्या मागे लागलेली असते आणि शेठची मुलगी मोटार घेऊन फिरायला गेलेली असते. घरात फक्त नोकरच असतात, म्हणजेच घराला घरपणच राहत नाही. पुण्याच्या आधारावर सर्व काही मिळाले, बंगला मिळाला, मोटार मिळाली, फ्रीज मिळाला. असे पुण्य असूनही पापाचे अनुबंध बांधेल असे वर्तन असते. लोभ-मोह याच्यात वेळ जातो आणि (पुण्य) उपभोगूही शकत नाही. पापानुबंधी पुण्यवाले लोक तर विषयांची लुटबाजीच करतात.

म्हणून तर बंगला आहे, गाड्या आहेत, बायको आहे, मुले आहेत, सर्व काही आहे तरीही पूर्ण दिवस हाय, हाय, हाय, हाय, पैसे कुठून आणू? म्हणजे दिवसभर पापच बांधत राहतो. या जन्मात पुण्य उपभोगतो

आणि येणाऱ्या जन्मासाठी पाप बांधत राहतो. दिवसभर पळापळ-पळापळ, आणि ती कशी? बाय, बॉरो ॲन्ड स्टील (खरेदी करा, उधारी करा आणि चोरी करा). कोणताच नियम नाही. बाय तर बाय, नाही तर बॉरो, नाही तर स्टील. कोणत्याही प्रकारे ते हितकारी नाही.

सध्या तुमच्या शहराच्या आजूबाजूला पुण्य खूप मोठे दिसत आहे, पण ते सर्व पापानुबंधी पुण्य आहे. पुण्य आहे, बंगला आहे, गाडी आहे, घरात सगळ्या सुविधा आहेत, हे सर्व पुण्याच्या आधारावर आहे, परंतु हे पुण्य कसे आहे? ह्या पुण्यातून खराब विचार येतात की कोणाचे हिसकावून घेऊ? कोणाचे लुटू? कुठून गोळा करू? कोणाचे उपभोगू? अर्थात बिनहक्काचे उपभोगण्याची तयारी असते, बिनहक्काची लक्ष्मीही हिसकावून घेतात, ते सर्व पापानुबंधी पुण्य आहे! मनुष्यत्व म्हणजे मोक्षाला जाण्याची वेळ मिळाली आहे, अशावेळी हा तर गोळा करण्यामागे लागला आहे, ते पापानुबंधी पुण्य आहे. त्यामुळे पापेच बांधली जातात. म्हणजेच हे भटकावणारे असे पुण्य आहे.

कित्येक जण तर जणू एखाद्या स्टेटचे ठाकूर आहेत अशा ऐशोआरामात जगतात. करोडो रुपयांच्या फ्लॅटमध्ये राहतात. पण ज्ञानी काय बघत असतील? ज्ञानींना करुणा येते त्या बिचाऱ्यांसाठी. जितकी करुणा बोरीवलीवाल्यांसाठी (मुंबईचा मध्यमवर्गीय परिसर) येत नाही, तितकी करुणा यांच्यासाठी येते. असे का बरे?

**प्रश्नकर्ता :** कारण हे सर्व पापानुबंधी पुण्य आहे, म्हणून.

**दादाश्री :** पापानुबंधी पुण्य तर आहेच, पण ओहोहो! या लोकांचे पुण्य बर्फासारखे आहे. जसा बर्फ वितळतो, तसेच पुण्यही सतत वितळतच राहिले आहे, ज्ञानींना दिसते की हे वितळत चालले आहे! मासा तडफडतो तसे तडफडत आहे. याउलट बोरीवलीवाल्यांचे पुण्य पाण्यासारखे, त्यात मग वितळण्यासारखे राहिलेच काय? पण हे तर वितळत चालले आहे.

हे भोगणाऱ्यांना माहीत नाही आणि त्याचाच हा सर्व *कढापा-अजंपा* (बेचैनी, अशांती) आहे. यात उपभोगण्याचे राहिलेच कुठे?

सध्याच्या या कलियुगात उपभोगणे कसले? उलट हे तर कुरूप दिसते. आजपासून साठ वर्षांपूर्वी जे रूप होते, तसे रूपच नाही ना आता. मुंबई तर शांतीचे ठिकाण होते.

आता ते रूपच नाही. साठ वर्षांपूर्वी मरीन लाइन्सवर राहत असेल ना, तर तिथे देवगतीसारखे वाटायचे. पण आता तर तेथील लोक गांगरून गेलेले दिसतात! दिवसभर वैतागलेले आणि गोंधळलेले असे लोक दिसतात. त्या काळात तेथील लोक सकाळी बसून पेपर वाचायचे तेव्हा असे वाटायचे जणू सारे देवी–देवता पेपर वाचत आहेत. अजिबात क्लेश नाही, बेचैनी नाही. पूर्वी सकाळी 'मुंबई समाचार' पेपर येत असे. अन्य पेपर पण होते पण त्यांची नावे तर आता लुप्त झाली आहेत. मीसुद्धा मरीन लाइन्सवर उतरत असे. पण लोकांना त्यावेळी खूप शांती असायची! इतकी हाय–हाय नव्हती. इतका लोभ नव्हता, इतका मोह नव्हता, इतकी तृष्णा नव्हती, आणि शुद्ध तुपाबद्दल तर शंकाच करावी लागत नसे. आणि हल्ली तर शुद्ध तूप घ्यायला गेलो तर मिळणारही नाही.

मलबार हिल एवढे पुण्य असेल, पण बर्फाचा डोंगर आहे ते पुण्य. मलबार हिल एवढा मोठा बर्फ असेल, पण दिवसेंदिवस काय होत जाईल? चोवीस तास निरंतर वितळतच जाईल. पण त्यांना स्वतःलाच माहीतच नाही, या मलबार हिल किंवा अशा सर्व ठिकाणी राहणाऱ्या लोकांना, टॉप क्लासच्या लोकांना माहीतच नाही की आपले काय होत चालले आहे? रात्रंदिवस पुण्य वितळत चालले आहे, ही तर करुणा करण्यासारखी दशा आहे! येथून काय खाता–खाता काय खावे लागेल हे माहीत नाही, म्हणून हे सर्व चालले आहे. पापानुबंधी पुण्य आहे. दिवसभर हाय पैसा, हाय पैसा! कुठून पैसे गोळा करू, दिवसभर त्याच विचारात, कुठून विषयविकाराचे सुख भोगू, असे करू, तसे करू, पैसा! हाय, हाय, हाय, हाय. आणि बघा ना, हे मोठमोठे पुण्याचे डोंगर वितळत चालले आहेत. ते पुण्य संपणार आहे. आणि परत जसे होते तसेच्या तसेच, दोन्ही हात रिकामेच. मग चार पायात (जनावरात) जाऊनही पत्ता लागणार नाही. म्हणून ज्ञानींना करुणा येते की अरेरे! या दुःखातून हे

सर्व सुटले तर बरे! काही चांगले संयोग मिळाले तर बरे. बघा ना, यांना चांगला संयोग मिळाला. हे शेठजी तर कधी तिथून सुटतील आणि कधी इथे येतील, अशी आमची नक्कीच इच्छा आहे, पण तसा मेळ काही बसत नाही, आणि ज्यांचा मेळ बसतो ते तर येतात सुद्धा.

**प्रश्नकर्ता :** दादा, इतर वाचकांना मोक्षाच्या अन्य गोष्टी समजत नसल्या तरी पण या दु:खांबद्दल तर बरोबर समजते.

**दादाश्री :** ते तर समजेलच, सगळ्यांनाच समजेल, ही दिव्यासारखी स्पष्ट गोष्ट आहे! अरे, मोक्षाची गोष्ट जाऊ द्या, पण दु:खाचे निवारण तर झाले आज! संसारी दु:खांचा अभाव तर झाला! आणि तीच मुक्तीची पहिली निशाणी आहे. संसारातील दु:खांपासून मुक्त झाले.

## ओव्हरड्राफ्ट वापरला ॲडव्हान्समध्ये!

चार घरांचा मालक, पण घरात पाच रुपयेही नसतात आणि भावनगरच्या राजासारखा रुबाब असतो! तर हा अहंकार काय कामाचा?

**प्रश्नकर्ता :** दादा, पण व्यवहारात कित्येक वेळा असेही घडते की जो असे सर्व ठेवतो ना, त्याला असे सर्व येऊन मिळते सुद्धा?

**दादाश्री :** मिळते, पण पाप बांधून मिळते, त्याचा नियमच असा आहे. तुझे सर्व काही खर्च करून तुझे काउंटर वेट ठेवून तू हे सर्व घे. आणि आज नसेल तर तू ओव्हरड्राफ्ट घे. म्हणजे ओव्हरड्राफ्ट घेऊन तो परत मनुष्यातून जनावरातच जातो. उलटसुलट करून मिळवलेले कामाचे नाही, ते तर आपल्या पुण्याने सहज मिळालेले पाहिजे.

अर्थात मिळून तर जाते पण सगळे ओव्हरड्राफ्ट घेत असतात. चोरीचे विचार मनातून जात नाहीत, खोटेपणाचे विचार, कपटाचे विचार जात नाहीत, कावेबाजीचे विचार जात नाहीत. मग काय? नुसती पापेच बांधत राहतात ना? हे सर्व होताच कामा नये. जरी मिळाले तरी पण! म्हणून मी तर संन्यास घ्यायला तयार होतो की जर अशा प्रकारे दोष बांधले जात असतील तर संन्यास घेणे चांगले. भयंकर उपाधी, इतक्या तापात पोळून निघालो. अज्ञानदशेत तर खूप समजदार माणूस, एका

तासातच पोळतो. त्या दु:खामुळे त्याला असेच वाटते जळो, आता मला काहीच नको. जड बुद्धीवाल्यांना ताप कमी जाणवतो, पण सूक्ष्म बुद्धीवाल्यांना ताप सहनच कसा होणार? हे तर आश्चर्यच आहे!

## पुण्यानुबंधी पुण्य

एक पुण्य असे असते जे भटकवत नाही, पण तसे पुण्य या काळात खूपच कमी असते आणि तेसुद्धा आता काही काळानंतर संपून जाईल. त्याला पुण्यानुबंधी पुण्य म्हणतात. जे काही पुण्याचे कर्म केले, चांगले कर्म आणि त्यात जर सांसारिक हेतू नसेल, सांसारिक कोणतीही इच्छा नसेल तर त्यावेळी जे पुण्य बांधले जाते, ते पुण्यानुबंधी पुण्य.

पुण्य उपभोगतात आणि सोबत आत्मकल्याणासाठी अभ्यास, क्रिया वगैरे करतात. पुण्य उपभोगतात आणि नवीन पुण्य बांधत असतात. ज्यामुळे अभ्युदयाने मोक्ष फळ मिळते. पुण्यानुबंधी पुण्य कशाला म्हणतात की आज पुण्य आहे, चांगले सुख उपभोगत आहे, कोणतीही अडचण नाही आणि परत दिवसभर धर्माचे आणि धर्माचेच करत राहतो, ते पुण्यानुबंधी पुण्य. असेच विचार येतात, फक्त धर्माचे आणि धर्माचेच, सत्संगातच राहण्याचे विचार येतात. आणि ज्या पुण्याने सुख-सुविधा जास्त नसतात, पण उच्च विचार येतात की, कसेही करून कोणालाही दु:ख होणार नाही असा व्यवहार मी करू, असे वर्तन करू, जरी स्वत:ला थोडी अडचण झाली तरी हरकत नाही, पण इतर कोणाला अडचण होऊ देणार नाही. त्याला पुण्यानुबंधी पुण्य म्हटले जाते, म्हणजे नवे अनुबंधही पुण्याचेच होतात.

**प्रश्नकर्ता :** पुण्यानुबंधी पुण्याचे उदाहरण द्या ना.

**दादाश्री :** समजा आज एका माणसाजवळ गाडी-बंगला वगैरे सर्व साधने आहेत, पत्नी चांगली आहे, मुले चांगली आहेत, नोकर चांगले आहेत, तर हे जे काही चांगले मिळाले आहे, त्याला काय म्हटले जाते? लोक म्हणतात, की तो 'पुण्यशाली आहे.' पण आता हा पुण्यशाली काय करत आहे, हे जर आपण पाहिले, तर तो दिवसभर

साधू–संतांची सेवा करतो, दुसऱ्यांची सेवा करतो आणि मोक्षासाठी तयारी करतो. असे सर्व करता करता त्याला मोक्षाचे साधनही मिळून जाते. आजही पुण्य आहे आणि परत नवीन पुण्य बांधत आहे आणि जरी पुण्य कमी मिळाले, तरी पण विचार मात्र तसेच येतात की, 'मोक्षाला जायचे आहे' तर हे आहे पुण्यानुबंधी पुण्य. तुम्ही मला भेटलात हे तुमचे कोणते तरी पुण्यानुबंधी पुण्य असेल ना, त्या आधारावर भेटलात. (पुण्याचा) जरासा थेंब पडला असेल, नाहीतर भेटूच शकलो नसतो.

हट्टाने केलेली सर्व कामे, हट्टाग्रही तप, हट्टाग्रही क्रिया, या सर्वांपासून पापानुबंधी पुण्य बांधले जाते. आणि समजपूर्वक केलेले तप, क्रिया, स्वत:च्या आत्मकल्याणाच्या हेतूपूर्वक केलेल्या कर्मांमुळे पुण्यानुबंधी पुण्य बांधले जाते आणि मग कधी काळी त्याला ज्ञानी पुरुष भेटतात आणि तो मोक्षाला जातो.

## दोन्ही दृष्टी वेगवेगळ्या

**प्रश्नकर्ता :** आताच्या काळात सामान्य व्यक्तीला असे वाटते की, वाईट मार्गाने किंवा वाईट कर्मांद्वारेच भौतिक सुख–सुविधा मिळतात, म्हणून मग निसर्गाच्या न्यायावरून त्याचा विश्वास उडत जातो आणि वाईट कर्म करण्यासाठी तो प्रेरित होतो.

**दादाश्री :** हो, सामान्य व्यक्तीला तसे वाटते, वाईट मार्गाने आणि वाईट कर्मांद्वारेच भौतिक सुख–सुविधा मिळतात, त्याचे कारण हे कलियुग आहे आणि दूषमकाळ आहे. लोकांना भौतिक सुख आणि सुविधा पुण्याशिवाय मिळत नाहीत. कोणतीही सुविधा पुण्याशिवाय मिळत नाही. एक रुपया देखील पुण्याशिवाय हातात येत नाही.

एक पापानुबंधी पुण्य आणि दुसरे पुण्यानुबंधी पुण्य, या दोन्हींना ओळखण्यासाठी आपल्याला समज असायला हवी.

स्वत: उपभोगतो काय? तर पुण्य, आणि तरीही काय बांधत आहे? तर पाप बांधत आहे. म्हणून तुम्हाला असे वाटते की पापाचे असे खराब कर्म करतो तरीही सुख कसे काय भोगत आहे? नाही,

उपभोगत आहे ते तर पुण्यच आहे, ही गोष्ट चुकीची नाही. पापाचे फळ सुख असे कधी नसतेच. हे तर नव्याने स्वत:चे येणारे जीवन नष्ट करीत आहे. म्हणून तुम्हाला असे वाटते की ही व्यक्ती असे का करत आहे?

आणि मग निसर्ग त्याला मदत सुद्धा करतो. कारण निसर्ग त्याला खाली घेऊन जाणार आहे, अधोगतीमध्ये, म्हणून त्याला मदत करतो. आणि एखादा नवीन चोर असेल, आणि आज जर त्याने कोणाच्या खिशात हात घातला, तर त्याला पकडवून देतो, की नको, हा जर ह्याच्यात पडला तर खाली घसरत जाईल. आणि त्या नव्या चोराला पकडवून देतो, असे का? तर त्याला ऊर्ध्वगतीला घेऊन जायचे आहे आणि तो जो पक्का चोर आहे, त्याला जाऊ देतो. खालच्या गतीमध्ये जा, खूप मार खा, नवीन चोर असेल तर तो पकडला जातो की नाही पकडला जात?

**प्रश्नकर्ता :** पकडला जातो.

**दादाश्री :** हो, आणि पक्के चोर मात्र पकडले जात नाहीत. सरकारने असे-तसे काहीही केले तरीही ते कशातही पकडले जात नाहीत, ते कोणाच्या जाळ्यात अडकतच नाहीत, सगळ्यांना विकून खातील असे असतात! कित्येक म्हणतात ना, इन्कमटॅक्सवाल्यांना तर मी खिशात घालून फिरतो. स्वत:च्या जोखीमदारी वर बोलतात ना! या सगळ्या क्रिया ते स्वत:च्या जोखीमदारी वर करतात ना? ती काय आपली जोखीमदारी आहे?

## पापानुबंधी पुण्याची लक्ष्मी

पापानुबंधी पुण्याची लक्ष्मी म्हणजे काय? तर जेव्हा लक्ष्मी येते तेव्हा कुठून मिळवू, कोणाचे पळवू, बिनहक्काचे कसे उपभोगू, बिनहक्काचे हिसकावून घेऊ, असे सारे पाशवतेचे विचार येतात. कोणाला मदत करण्याचा विचार तर अजिबात येत नाही. आणि जर दान दिलेच तर तेही नाव कमाविण्यासाठीच देतो. मी नाव कसे कमावू? कोणाच्याही हृदयाला शांती पोहोचवत नाही. येथे ज्ञानी पुरुषांच्या हजेरीत तर हृदय

तृप्त होते. रात्रभर हृदयात शीतलता वाटत असते, आणि हृदय तृप्त झाले होणे हे तर एकेका व्यक्तीला पाच–पाच लाख रुपये देण्यासमान आहे. पण तरीही हृदय तृप्त होत नाही. रुपये दिल्याने तर उलट उपाधी होते.

म्हणजे ज्यांचे पापानुबंधी पुण्य आहे, त्यांना इथे येता येणारच नाही. म्हणून तर आपल्या इथे असे लक्ष्मीपती येऊ शकत नाहीत. इथे तर ज्यांचे पुण्यानुबंधी पुण्य असेल, खरी लक्ष्मी असेल, असे सर्व येतात. खरी लक्ष्मी म्हणजे दुसरे काही नाही, या काळानुसार अगदी खरी लक्ष्मी तर नसतेच. आमच्या घरीसुद्धा अगदी खरी नाही. पण या काळानुसार असे चांगले विचार येतात की याला कशा प्रकारे सुख मिळेल, त्याला ज्ञान कसे प्राप्त होईल, धर्माचे विचार येतात, ती चांगली लक्ष्मी म्हटली जाते. पुण्यानुबंधी पुण्याची लक्ष्मी म्हटली जाते. पुण्यानुबंधी पुण्य म्हणजे पुण्य आहे आणि परत नवीन पुण्य बांधत आहे. विचार सगळे चांगले असतात. दुसऱ्यांचेही पुण्य तर असते पण विचार खराब असतात, म्हणजे काय उपभोगू? कुठून मिळवू, दिवसभर हेच, रात्री पलंगावर झोपताझोपता सुद्धा मशीन चालवतच राहतो, रात्रभर.

आणि मग तिथे मुंबईमध्ये, ते लोक मला त्यांच्या घरी दर्शनासाठी बोलावतात. कारण लोक मला ओळखतात म्हणून ते दर्शनासाठी घरी घेऊन जातात. आम्ही तिथे जातो तेव्हा, तसे तर तो करोडो रुपयांचे मालक असतात, पण जणू मुडद्यांनाच बसवले आहेत तसे ते दिसतात आपल्याला. ते नमस्कार करतात ना! मी समजून जातो की हे बिचारे मुडदे आहेत. मग मी तिथे बघतो की कोण–कोण चांगले आहेत? तर तिथे त्यांचे नोकर भेटतात, अहो, त्यांचे तर शरीर मजबूत, लाल, लाल... मग ते आचारी भेटतात, ते तर अगदी धष्टपुष्ट, जसे हापूस आंबेच बघून घ्या! तेव्हा मी समजून जायचो की हे शेठ लोक अधोगतीत जाणारे आहेत. त्याचे हे चिन्ह आज दिसत आहे.

बत्तीस पक्वानांचे जेवणाचे ताट असेल पण तो खाऊ शकत नाही, आम्ही सगळे सोबतच जेवतो, परंतु जर शेठला विचारले, की तुम्ही खात का नाही? तर म्हणेल, मला डायबीटीज आहे आणि ब्लडप्रेशर आहे.

डॉक्टरांनी शेठला सांगितलेले असते की, 'हे बघा, तुम्हाला ब्लडप्रेशर आहे, डायबीटीज आहे, म्हणून काही खायचे नाही. फक्त बाजरीची भाकरी आणि दहीच खायचे, बरे का! इतर काहीच खाऊ नका.' अहो, आमच्या इथे आम्ही बैलाला शेतात घेऊन जातो, तरी बैल खात का नाही? शेतात आहे तरीही? तर त्याचे तोंड बांधलेले आहे. तोंडाला शीकी बांधतात ना? काय म्हणतात त्याला?

**प्रश्नकर्ता :** जाळी.

**दादाश्री :** आमच्या इथे त्याला 'शीकी' म्हणतात. ती बांधलेली असते, म्हणून बिचाऱ्याला खायचे असेल तरीही खाऊ शकत नाही. डॉक्टरांनी शेठला सांगितलेले असते की, तुम्ही मरून जाल म्हणून...! तसे या लोकांच्या तोंडावर 'शीकी' बांधलेली असते.

अर्थात निव्वळ नरक यातनाच भोगत आहेत. मी सगळ्या शेठलोकांकडे जाऊन आलेलो आहे. मग जेव्हा इथे दर्शन करवितो, तेव्हा कुठे त्यांना शांती मिळते. मी त्यांना सांगतो, दादा भगवानांचे नाव घेत राहा. कारण ज्ञान तर त्यांच्या वाट्याला येतच नाही. त्यांच्यासाठी तशी व्यवस्था केली तरीही ते येऊच शकत नाही. म्हणून महादुःख आहे हे तर!

## पुण्यशालीच उपभोग घेऊ शकतो!

लक्ष्मी मनुष्याला मजूर बनवते. लक्ष्मी गरजेपेक्षा जास्त आली की मग मनुष्य मजुरासारखा होतो. त्याच्याकडे पैसे जास्त आहेत पण तो दानेश्वरी पण आहे, म्हणून ठीक आहे. नाहीतर मजूरच म्हटला जाईल ना! आणि दिवसभर राबतच असतो, त्याला बायकोची पर्वा नसते, मुलांचा विचार नसतो, कोणाचीच पर्वा नसते, फक्त पैशांचीच फिकीर असते. म्हणजे लक्ष्मी मनुष्याला हळूहळू मजूर बनवते आणि मग त्याला तिर्यंच गतीत घेऊन जाते. कारण पापानुबंधी पुण्य आहे ना! पुण्यानुबंधी पुण्य असेल तर हरकत नाही. पुण्यानुबंधी पुण्य कशाला म्हणतात की, दिवसभर फक्त अर्धाच तास मेहनत करावी लागते. त्याने फक्त अर्धा तासच मेहनत केली तरी सर्व कामे हळूहळू सुरळीतपणे होत राहतात.

हे जग तर असे आहे जगात उपभोग घेणारेही असतात आणि मेहनत करणारेही असतात. सर्व सरमिसळ असते. मेहनत करणारे असे समजतात की 'हे मी करत आहे.' म्हणजे त्यात त्यांचा अहंकार असतो. याउलट भोगणाऱ्यामध्ये तो अहंकार नसतो, तेव्हा त्याला भोक्तेपणाचा रस मिळतो. आणि त्या मेहनत करणाऱ्याला अहंकाराचा गर्वरस मिळतो.

एक शेठ मला सांगतो की, 'या माझ्या मुलाला काहीतरी सांगा ना, त्याला कसलीही मेहनत करायची नाही आणि निवांत चैनीत राहतो. मी शेठला सांगितले, 'काही बोलण्यासारखे नाही. तो त्याच्या स्वतःच्या वाट्याचे पुण्य उपभोगत आहे. त्यात आपण दखल का करावी?' त्यावर तो मला म्हणाला, 'त्याला समंजस नाही का बनवायचे?' मी म्हटले, जगात जो उपभोगत आहे तोच समंजस म्हटला जातो. आणि जो वाया घालवतो त्याला वेडा म्हटला जातो आणि मेहनत करत राहतो त्याला मजूर म्हटले जाते. परंतु मेहनत करतो त्याला अहंकाराचा रस मिळतो ना! लांब कोट घालून बाहेर जातो तेव्हा लोक म्हणतात, 'शेठजी आले, शेठजी आले.' बस इतकेच. आणि भोगणाऱ्याला असे कोणी शेठ-वेठची पर्वाच नसते. 'आम्ही तर आमचे उपभोगले तेवढे खरे.' असे तो बोलतो.

आताची जी लक्ष्मी आहे, तिला तर लक्ष्मी म्हणताच येणार नाही. ही तर पापानुबंधी पुण्याची लक्ष्मी आहे. अज्ञान तप केले होते त्यामुळे पुण्य बांधले गेलेले, त्याचे हे फळ आले. फळस्वरूपात लक्ष्मी आली. ही लक्ष्मी माणसाला वेडाच बनवून टाकते. याला सुख म्हणायचेच कसे? सुख तर, पैशांचा विचारच येत नाही, त्याला सुख म्हणायचे. आम्हाला तर वर्षातून क्वचित एखाद्या वेळेस विचार येतो की खिशात पैसे आहेत की नाही?

**प्रश्नकर्ता :** ओझे वाटते का?

**दादाश्री :** नाही, ओझे तर आम्हाला नसतेच. पण आम्हाला तसे विचारच येत नाहीत ना! विचार कशाला करायचे? पुढे-मागे सर्व काही तयारच असते. जसे खाण्या-पिण्याचे तुमच्या टेबलावर येते की नाही येत?

## भोगणे, रुपयांचे की वेदनीयचे?

खरे तर ज्याला दगड लागतो, त्याचीच चूक. भोगतो त्याची चूक एवढेच नाही, तर भोगण्याचे बक्षीसही आहे. पापाचे बक्षीस मिळेल तर ते त्याच्या वाईट कर्तव्याचे दंड आणि फुले वाहतील ते त्याच्या चांगल्या कर्तव्याच्या पुण्याचे बक्षीस, पण तरीही दोन्ही भोगणेच आहे, अशाताचे किंवा शाताचे.

निसर्ग काय म्हणतो? त्याने किती रुपये खर्च केले ते आमच्या येथे बघितले जात नाही. पण वेदनीय काय भोगले? शाता की अशाता, इतकेच आमच्या येथे बघितले जाते. रुपये नसतील तरीही शाता भोगेल आणि रुपये असतील तरीही अशाता भोगेल. अर्थात शाता किंवा अशाता वेदनीय भोगतो, ते पैशांवर आधारित नाही.

## खरे धन सुख देते!

वडिलांनी मुलाला दहा लाख रुपये दिले असतील आणि वडील म्हणतील, 'आता मी आध्यात्मिक जीवन जगेन.' तेव्हा मग तो मुलगा नेहमी दारूत, मांसाहारात, शेअर बाजारात, या सगळ्या गोष्टीत तो पैसे गमावून बसतो. कारण जे पैसे चुकीच्या मार्गाने जमा झालेले असतात ते स्वत:जवळ राहत नाहीत. आज तर खरे धन, खऱ्या मेहनतीचे धनसुद्धा राहत नाही, तर चुकीचे धन कसे राहील? अर्थात पुण्याचे धन असले पाहिजे, त्यात अप्रामाणिकता नसते. दानत चांगली स्वच्छ असेल, असा पैसा असेल, तरच ते सुख देईल. नाहीतर आता दूषमकाळाचे धनसुद्धा पुण्याचेच म्हटले जाते, पण पापानुबंधी पुण्याचे आहे, त्यामुळे तर पापेच बांधली जातात. त्यापेक्षा त्या लक्ष्मीला म्हणावे, 'तू येऊच नकोस. इथून दूरच रहा. त्यातच आमची शोभा आहे, आणि तुझीही शोभा वाढेल.' हे बंगले बांधतात, त्यात सारे पापानुबंधी पुण्य उघडपणे दिसून येते. त्यात इथे कोणी असा असेल, हजारात एखादाच असा असेल की ज्याचे पुण्यानुबंधी पुण्य असेल. बाकी, हे सगळे पापानुबंधी पुण्य आहे. इतकी लक्ष्मी असू शकते का कधी काळी? नुसते पापेच बांधतात, हे सर्व तर तिर्यंचगतीचे रिटर्न तिकीट घेऊन आले आहेत.

एक मिनिटही राहता येणार नाही असा हा संसार, जबरदस्त पुण्य असेल तरीही अंतरदाह कमी होत नाही. अंतरदाह निरंतर जळतच राहतो. अंतरदाह कशामुळे होतो? अंतरदाह पाप-पुण्याच्या आधीन नाही, तर 'रॉंग बिलीफ'च्या आधीन आहे. चारही बाजूंनी सगळे फर्स्टक्लास संयोग असतील, तरीही अंतरदाह होतच राहतो. तो आता कसा मिटेल? शेवटी पुण्य पण संपून जाईल. जगाचा नियम आहे की पुण्य संपते. तेव्हा मग काय होईल? पापाचा उदय होईल. हा अंतरदाह तर आहेच, आणि मग पापाचा उदय होतेवेळी बाहेरचा दाह उत्पन्न होईल. तेव्हा तुझी काय दशा होणार? म्हणून सावध व्हा, असे भगवंत सांगतात.

## पुण्यानेच पैसा मिळतो

**प्रश्नकर्ता :** या काळात तर पापी माणसांजवळच पैसा आहे.

**दादाश्री :** पापी माणसांजवळ नाही. मी तुम्हाला नीट समजावतो. तुम्ही एकदा माझे म्हणणे नीट समजून घ्या की पुण्याशिवाय तर पैसा आपल्याला स्पर्शच करू शकत नाही. काळ्या बाजाराचाही स्पर्श करणार नाही किंवा सफेद बाजाराचाही स्पर्श करणार नाही. पुण्याशिवाय तर चोरीचा पैसाही आपल्याला स्पर्श करणार नाही. पण ते पापानुबंधी पुण्य आहे. तुम्ही म्हणता ते पाप, ते शेवटी पापातच घेऊन जाते. ते पुण्यच त्याला अधोगतीला घेऊन जाते.

खराब पैसा येतो म्हणून खराब विचार येतात की कोणाचे उपभोगून घेऊ, दिवसभर भेसळ करण्याचे विचार येतात, तो अधोगतीत जातो. पुण्य भोगत नाही आणि अधोगतीत जातो. त्यापेक्षा तर पुण्यानुबंधी पाप चांगले की आज जरा भाजी आणण्यासाठी अडचण येते, पण दिवसभर भगवंताचे नाव तर घेतले जाते. आणि पुण्यानुबंधी पुण्य असेल, तो तर पुण्य भोगतो आणि नवीन पुण्य उत्पन्न होते.

## ...मग तर पुढील जन्माचेही बिघडेल!

**प्रश्नकर्ता :** आजचा टाइम असा आहे की मनुष्य स्वतःचे

भरणपोषणही पूर्णपणे करू शकत नाही. ते पूर्ण करण्यासाठी त्याला खरे-खोटे करावे लागते, तर तसे करू शकतो का?

**दादाश्री :** ही तर उधारी करून तूप पिण्यासारखी गोष्ट आहे. त्याच्यासारखा हा व्यापार आहे. (पूर्वी) चुकीचे केले होते म्हणून आता कमी पडत आहे. आता कमी पडण्याचे कारण काय? तर ते पाप आहे, म्हणून आज कमी पडते. भाजी नाही, दुसरे काही नाही. पण तरीही आता जर चांगले विचार येत असतील, धर्मात-मंदिरात जाण्याचे, उपाश्रयात जाण्याचे, काही सेवा करण्याचे, असे विचार येत असतील, तर आज जरी पाप असेल, तरीही तो पुण्य बांधत आहे, परंतु पाप आहे आणि परत पापच बांधत असेल, असे होता कामा नये. पाप आहे, कमी पडत आहे आणि पुन्हा तसेच उलट केले तर आपल्याजवळ काय उरले?

## ते उपार्जन बुद्धीचे की मेहनतीचे?

हे सर्व समजून तर घ्यावे लागेल ना? असे खोटेनाटे कुठपर्यंत चालेल? आणि उपाधी तर आवडत नाही. हा मनुष्य देह उपाधीपासून मुक्त होण्यासाठी आहे. फक्त पैसे कमावण्यासाठी नाही. पैसे कशाने कमावले जातात? मेहनतीने की बुद्धीने?

**प्रश्नकर्ता :** दोन्ही गोष्टींनी.

**दादाश्री :** जर पैसे मेहनतीने कमावता आले असते तर या मजुरांजवळ खूप पैसे असते. कारण हे मजूरच अधिक मेहनत करतात ना! आणि जर पैसे बुद्धीने कमावता आले असते तर हे सारे पंडित आहेतच ना! पण त्यांची चप्पल अर्धी घासलेली असते. पैसे कमावणे हा बुद्धीचा खेळ नाही व मेहनतीचे फळसुद्धा नाही. ते तर तुम्ही पूर्वी जे पुण्य केलेले आहे त्याचे फळस्वरूप तुम्हाला मिळतात. आणि नुकसान, ते पाप केले आहे, त्याचे फळस्वरूप आहे. पुण्य आणि पापाच्या आधीन लक्ष्मी आहे. म्हणून जर लक्ष्मी पाहिजे असेल तर आपल्याला पुण्य-पापाकडे लक्ष द्यावे लागेल.

भुलेश्वरमध्ये ज्यांची अर्धी चप्पल झिजलेली आहे अशी

अक्कलवाली खूप माणसे आहेत. काही व्यक्ती महिन्याचे पाचशे कमावतात, तर कोणी सातशे कमावतात, कोणी अकराशे कमावतात. तो मोठ्याने ओरडून सांगतो की मी अकराशे कमावतो. अरे, पण तुझी चप्पल अर्धीच्या अर्धीच आहे. बघा, अकलेचे कारखाने! आणि कमी अक्कलवाले खूप कमावतात. अक्कलवाल्याचे टाकलेले फासे सरळ पडतात की मूर्ख मनुष्याचे सरळ पडतात?

**प्रश्नकर्ता :** ज्याचे पुण्य असेल त्याचे सरळ पडतात.

**दादाश्री :** बस, त्यात तर अक्कल चालतच नाहीना! उलट अक्कलवाल्यांचे तर विपरीत असते. अक्कल तर त्याला दु:खात मदत करते, दु:खात पुन्हा सर्व कसे नीट करायचे, यासाठी त्याला मदत करते.

## बुद्धी मुनीमची आणि पुण्य शेठचे

लक्ष्मी कशाने येते, आणि कशाने जाते ते आम्ही जाणतो. लक्ष्मी मेहनतीने येत नाही, किंवा बुद्धीने किंवा ट्रिक वापरल्याने येत नाही. लक्ष्मी कशाने मिळवता येते? जर सहज रित्या कमावता आले असते तर आपल्या मंत्र्यांना चार आणेही मिळाले नसते. ही लक्ष्मी तर पुण्यामुळे कमावली जाते. वेडा असेल तरीही पुण्यामुळे कमावत राहतो.

लक्ष्मी पुण्यामुळे येते. बुद्धीचा उपयोग केल्यानेही येत नाही. या मिल मालकांमध्ये आणि शेठजींमध्ये एक थेंबही बुद्धी नसते, पण लक्ष्मी मात्र भरपूर येते आणि त्यांचा मुनीम बुद्धी चालवत राहतो, इन्कमटॅक्स ऑफिसमध्ये जातो तेव्हा साहेबांच्या शिव्याही मुनीमच खातो, उलट शेठ तर आरामातच झोपलेला असतो.

एक शेठ होते, शेठ आणि त्याचे मुनीम दोघे बसलेले होते, अहमदाबादमध्येच. लाकडाचा तख्ता व त्यावर गादी, असा पलंग, समोर टीपॉय आणि त्यावर जेवणाचे ताट होते. शेठ जेवायला बसले होते. मी शेठची डिजाइन सांगतो. जमिनीपासून तीन फूट उंचीवर बसले होते. जमिनीपासून दीड फुटावर डोके. चेहऱ्याचा त्रिकोणी आकार मोठे-मोठे डोळे आणि मोठे नाक, ओठ तर मोठ्या भज्यासारखे आणि जवळ

फोन. खाता-खाता फोन येत आणि ते बोलत. शेठला धड खाता पण येत नव्हते. पुरीचे दोन-तीन तुकडे खाली पडले होते आणि कितीतरी भात खाली सांडलेला होता. फोनची घंटी वाजे आणि शेठ म्हणत, 'दोन हजार गाठोडी घेऊन टाका.' आणि दुसऱ्या दिवशी दोन लाख रुपये कमावून घेत. मुनीमजी बसल्या-बसल्या डोकेफोड करत होते. आणि शेठ मेहनतीशिवाय कमावत होते. तसे तर शेठच अकलेने कमावताना दिसतो. पण ही अक्कल ऐन वेळी पुण्याच्या जोराने प्रकाश देते. म्हणजे हे पुण्यामुळे घडते. ही गोष्ट तर शेठला आणि मुनीमला एकत्र बघाल तर समजेल. खरी अक्कल तर शेठच्या मुनीममध्येच असते, शेठमध्ये नाही. हे पुण्य कुठून आले? भगवंताची भक्ती समजपूर्वक केली म्हणून? नाही, समजल्याशिवाय भक्ती केली म्हणून. कोणावर उपकार केले, कोणाचे भले केले, या सगळ्यांमुळे पुण्य बांधले गेले.

## श्रीमंती कोणाला मिळते?

काय केले तर श्रीमंती येते? लोकांना खूप मदत केली तर लक्ष्मी आपल्याकडे येते! अन्यथा लक्ष्मी येत नाही. लक्ष्मी तर देण्याची इच्छा असणाऱ्याकडेच येते. जो दुसऱ्यांसाठी झिजतो, धोका खातो, नोबेलिटीचा उपयोग करतो, त्याच्याजवळ लक्ष्मी येते. लक्ष्मी निघून गेली असे वाटते खरे पण परत तिथेच येऊन उभी राहते.

**प्रश्नकर्ता :** आपण लिहिले आहे की, मोठे मन असलेलाच कमावतो. देण्या-घेण्यामध्ये जो मोठे मन ठेवतो तोच कमाई करतो. संकुचित मनाचा मनुष्य कधीच कमावत नाही.

**दादाश्री :** हो. सर्व प्रकारे नोबल असेल तर लक्ष्मी त्याच्याकडे जाते. या पाजींकडे लक्ष्मी जात असेल काय?

**प्रश्नकर्ता :** म्हणजेच पुण्यामुळे माणूस धनवान बनतो?

**दादाश्री :** धनवान होण्यासाठी पुण्य पाहिजे. पुण्य असेल तर पैसा येतो.

**प्रश्नकर्ता :** पैशांसाठी तर बुद्धीची गरज आहे, असे लिहिलेले आहे ना?

**दादाश्री :** नाही. बुद्धी तर नफा-नुकसान ह्या दोनच गोष्टी दाखवते. जिथे जाल तिथे नफा-नुकसान दाखवते. ती काही पैसे-वैसे देत नाही. बुद्धीने जर पैसे मिळाले असते ना, तर या भुलेश्वरमध्ये (मुंबईचा एक परिसर) इतके सारे बुद्धिमान मुनीम आहेत, शेठला जे समजत नाही ते सर्व त्यांना समजते, पण त्या बिचाऱ्यांची चप्पल मागून अर्धी झिजलेली असते आणि शेठ तर साडे तीनशे रुपयांचे बूट घालून फिरत असतात, तरीही बावळटच असतात!

पैसा कमावण्यासाठी पुण्याची गरज आहे, बुद्धीने तर उलट पाप बांधले जाते. बुद्धीने पैसा कमावायला जाल तर पाप बांधाल. माझ्यात बुद्धी नाही, म्हणून पाप बांधले जात नाही. आमच्यात बुद्धी एक सेंट परसेंटही नाही. (शंभर टक्के नाही).

## लक्ष्मीजी कोणाच्या मागे?

लक्ष्मी तर पुण्यशालींच्या मागेच फिरत राहते. आणि मेहनती लोक लक्ष्मीच्या मागे फिरत राहतात. म्हणून आपण बघितले पाहिजे की, पुण्य असेल तर लक्ष्मी आपल्या मागे येईल. नाही तर मेहनतीने पोळी-भाजी मिळेल, खायचे-प्यायचे मिळेल, एखादी मुलगी असेल तर तिचे लग्न होईल. पुण्याशिवाय लक्ष्मी मिळत नाही. म्हणून खरी हकीकत काय सांगते की 'तू जर पुण्यशाली आहेस तर कशाला तडफडतोस? आणि जर तू पुण्यशाली नाहीस तरीही कशासाठी तडफडतोस?

पुण्यशाली तर कसे असतात? हे अंमलदारही ऑफिसमधून वैतागून घरी परत येतात, तेव्हा पत्नी काय म्हणते, 'दीड तास लेट झालात, कुठे गेला होता?' हे बघा पुण्यशाली (!) पुण्यशालीसोबत असे होत असेल का? पुण्यशालीला तर हवेची उलटी झुळूक देखील लागत नाही. बालपणापासूनच ती क्वॉलिटी वेगळी असते. अपमानाचा योग मिळतच नाही. जिथे जाईल तिथे 'या, या भाऊ' अशा तऱ्हेने लहानाचे मोठे होतात आणि हा तर जिथे-तिथे सतत ठोकरच खात राहतो. याला काय अर्थ आहे? आणि नंतर जेव्हा पुण्य संपते तेव्हा परत जसेच्या तसेच! अर्थात तू जर पुण्यशाली नाहीस तर रात्रभर पट्टा

बांधून फिरलास तरी सकाळी पन्नास पदरी पडतील का? म्हणूनच तळमळू नकोस, आणि जे मिळेल ते खाऊन-पिऊन शांतपणे झोपून जा.

**प्रश्नकर्ता :** हा तर प्रारब्धवाद झाला ना?

**दादाश्री :** नाही, प्रारब्धवाद नाही. तू आपल्या परीने काम कर. मेहनत करून भाकर खा. उगाच नको ती खटपट का करत राहतोस? असे जमा करू आणि तसे जमा करू! जर तुला घरात मान नाही, बाहेर मान नाही, तर का धडपडतोस? आणि जिथे जाईल तिथे त्याला 'या-या, बसा' असे स्वागत करणारे असतील, असे खूप मोठे पुण्य सोबत आणले असेल, त्यांची तर गोष्टच वेगळी ना?

हे शेठ आयुष्यभराचे पंचवीस लाख घेऊन आलेले असतात, ते पंचवीस लाखाचे बावीस लाख करतात पण वाढवत नाहीत, वाढतील केव्हा? सतत धर्मात राहतील तर. परंतु जर त्यात ढवळाढवळ केली तर बिघडेल. निसर्गात ढवळाढवळ केली की बिघडेल. लक्ष्मी येते पण काहीच मिळत नाही.

## रँक (श्रेणी) पुण्यशालींची...

जे मोठे-मोठे चक्रवर्ती राजा होते, त्यांना तर आता दिवस आहे की रात्र आहे याचीसुद्धा जाणीव नसायची. त्यांनी सूर्यनारायणही बघितला नसेल, तरीसुद्धा मोठे राज्य सांभाळत असत. कारण त्यांचे पुण्य काम करत असते.

**प्रश्नकर्ता :** शालीभद्र शेठला देवी-देवता वरून सोन्याच्या नाण्यांच्या पेट्या देत असत, हे खरे आहे का?

**दादाश्री :** हो, देतात. सर्व काही देतात, त्याचे पुण्य असेल तोपर्यंत काय नाही देणार? आणि देवी-देवतांसोबत ऋणानुबंध असतात. त्यांचे नातेवाईक तिथे (देवलोकात) गेलेले असतात आणि पुण्य असेल तर सर्व काही देतात.

पुण्यशालींना कमी मेहनतीने सर्व फलीभूत होते (मिळते).

इथपर्यंतचे पुण्य असू शकते की फक्त सहज विचारच आला, काहीच प्रयत्न केला नाही तरी पण सगळ्या वस्तू त्या विचारानुसार मिळतात, ते सहज प्रयत्न. प्रयत्न निमित्त आहे, पण सहज प्रयत्नाला पुरुषार्थ म्हणणे ही व्याख्या चुकीची आहे.

लक्ष्मी म्हणजे पुण्यशाली लोकांचे काम आहे. पुण्याचा हिशोब असा आहे की, खूप मेहनत करतो आणि कमीत कमी मिळते, त्याला खूपच थोडे, साधारण पुण्य म्हटले जाते. त्यानंतर शारीरिक मेहनत जास्त करावी लागत नाही, पण वाणीची मेहनत करावी लागते, वकीलांसारखी, त्याला थोडे अधिक पुण्य म्हटले जाते, मजुराच्या तुलनेत. आणि त्याहून पुढे काय? तर वाणीची डोकेफोड करावी लागत नाही, शरीराचीही डोकेफोड करावी लागत नाही, पण मानसिक डोकेफोड करून कमावतो, तो अधिक पुण्यशाली म्हटला जातो, आणि त्याच्याही पुढे कोण? फक्त संकल्प करताच लगेच सर्व तयार होते. संकल्प केला तीच मेहनत. संकल्प केला की दोन बंगले, एक गोदाम, असा संकल्प केला की लगेच सर्व तयार होते, तो महापुण्यशाली. संकल्प करतो तीच मेहनत, बस. संकल्प करावा लागतो. संकल्पाशिवाय होत नाही. थोडी तरी मेहनत पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** पण मनुष्यामंध्ये असे होऊ शकत नाही.

**दादाश्री :** मनुष्यातही असे होऊ शकते. का नाही होणार? मनुष्यात तर हवे तेवढे होऊ शकते.

**प्रश्नकर्ता :** असे म्हटले गेले आहे की देवलोकात असे होत असते.

**दादाश्री :** देवलोकात देवतांचे सर्व काही सिद्ध होते. पण इथेही कुणा-कुणाला संकल्पसिद्धी होत असते. सर्व काही होते, आपले पुण्य पाहिजे. पुण्य उरले नाही, पुण्य कमी झाले आहे.

जितकी मेहनत तितके अंतराय, कारण मेहनत का करावी लागत आहे?

या जगात सर्वात अधिक पुण्यशाली कोण? तर ज्याला सहजच

विचार येतो, तो ठरवतो आणि कितीतरी वर्षांपर्यंत इच्छेशिवाय, मेहनतीशिवाय ज्याला मिळतच राहते, तो अधिक पुण्यवान. दुसऱ्या नंबरावर, इच्छा होते आणि तो पुन्हा पुन्हा ठरवतो आणि संध्याकाळी सहज मिळते, तो. तिसऱ्या नंबरवाल्याला इच्छा होते आणि प्रयत्न करतो आणि प्राप्त होते. चौथ्या नंबरवाल्यांना इच्छा होते आणि भयंकर प्रयत्न केल्यानंतर प्राप्त होते. पाचव्याला इच्छा होते आणि भयंकर प्रयत्न करूनसुद्धा प्राप्त होत नाही. या मजुरांना कठोर परिश्रम करावे लागते, आणि वरून शिव्याही खाव्या लागतात, तरीही पैसे मिळत नाहीत. आणि मिळाले तरी सांगता येत नाही की घरी जाऊन खायला मिळणार की नाही. ते सर्वात अधिक प्रयत्न करतात, तरीही प्राप्ती होत नाही.

## पुण्यानेच लाभतो सत्संग!

तुम्ही पुण्य केले आहे की नाही? म्हणून तर सी. ए. झालात.

**प्रश्नकर्ता :** आत्तापर्यंत पाप केले नाही. पुण्यच केले आहे.

**दादाश्री :** ते तर तुम्हाला तसे वाटते. पापही केले आहे पण पाप कमी केले असेल, पुण्य अधिक केले असेल. म्हणून तर या सत्संगात यायला वेळ मिळाला, येथे येऊ शकलात, नाहीतर सत्संगात यायला टाइमच कोणाला असतो?

## पुण्य-पापाच्या परिणामाने...

**प्रश्नकर्ता :** पाप आणि पुण्याशी त्याचा संबंध कशाप्रकारे असतो?

**दादाश्री :** हे पाप आहे ते, आत्ता तुम्ही इथे आलात तर तुम्ही कुणालाही ठोकर लागणार नाही अशा प्रकारे सांभाळून चालता, आणि ठोकर लागेल अशी जागा असेल, खूप गर्दी असेल, पण मनात असे विचार असतील की कुणाला लागले नाही तर बरे, अशा भावनेने तुम्ही इथे आलात तर तुमच्याकडून पुण्य बांधले जाईल.

आणि गर्दी आहे म्हणून ठोकर लागूही शकते, अशा भावनेने आलात तर पाप बांधले जाईल.

आपल्याकडून कुणालाही किंचितमात्र दुःख झाले, तर त्यामुळे पापच बांधले जाते. आणि कुणाला सुख दिले, शांती दिली, कुणाचे मन तृप्त झाले तर त्यामुळे निव्वळ पुण्यच बांधले जाते.

आता ही मागील जन्मी बांधलेली पापे, ती ह्या जन्मी पुन्हा उदयास येतात. जी योजना मागील जन्मात झाली होती, ती (योजना) ह्या जन्मात फळाला येते.

जेव्हा पापाचा उदय येतो तेव्हा पूर्ण दिवस वाईट विचार, चिंतेचे विचार येत राहतात, बाहेरही नुकसान होते, मुले आपल्या विरुद्ध होतात. भागीदारांशी भांडणे होतात, जेव्हा पापाचा उदय असतो तेव्हा. आणि जेव्हा पुण्याचा उदय होतो तेव्हा तर जो शत्रू असेल, तोही येऊन सांगेल, 'अरे चंदुभाऊ, काही काम असेल तर मला सांगा...' अरे, तू शत्रू, पण तेव्हा तर तुमच्या पुण्याचा उदय आला होता. म्हणजेच पुण्याचा उदय असेल तेव्हा शत्रू मित्र बनतात. आणि पापाचा उदय असेल तेव्हा मुले शत्रू बनतात. कोणी मुलगा त्याच्या बापावर दावा (खटला) मांडतो का?

**प्रश्नकर्ता :** करतोच ना.

**दादाश्री :** अरे, एका मुलाने त्याच्या बापावर दावा मांडला होता, नंतर त्याने काय केले? दावा मांडल्यानंतर त्याने वकीलाला सांगितले, वडील केस हारले त्यात काहीच हरकत नाही, उलट ते तर चांगलेच झाले. ही घ्या तुमची तीनशे रुपये फी. पण पुन्हा एकदा खटला चालवा. त्यावर वकील म्हणतो, 'का आता कशासाठी?' तर तो म्हणाला, 'नाक कापायचे आहे.' अरे मुर्खा, तुला बापाचे नाक कापायचे आहे? तेव्हा तो म्हणतो, 'हो, त्यासाठी मी दीडशे रुपये देईन.' मग त्याने बापाची फजिती करून, नाक कापून दाखवले. तात्पर्य हेच की जेव्हा आपली चूक असते व पापकर्माचा उदय असतो तेव्हा मुलगाही शत्रू बनतो.

## परम मित्र कोण?

पुण्य चांगले असेल तर सर्वच चांगले. पुण्यरूपी मित्र असेल तर जिथे जाल तिथे सुख, सुख आणि सुख. असा मित्र असायला हवा.

पापरूपी मित्र आला तर फटके दिल्याशिवाय राहत नाही. मग समभावाने निकाल होत नाही, तेव्हा ओरडावे लागते.

**प्रश्नकर्ता :** हे जे तुम्ही सांगितले की पुण्य कुठेही मित्राप्रमाणे काम करते...

**दादाश्री :** हो, कुठेही, अगदी वाईट जागी जरी तुम्ही अडकले असाल, तर तिथे तुमचे पुण्य तुमच्या मदतीला धावून येते.

**प्रश्नकर्ता :** आणि पाप घरात देखील दु:ख देते.

**दादाश्री :** पाप तर घरात तुम्ही अंथरुणावर झोपले असाल तरी मारून टाकते. अंथरुणावर सुद्धा चिंता करायला लावते, फर्स्ट क्लास अंथरुण अंथरलेले असेल तरीही चिंता करायला लावते. पाप सोडत नाही ना! म्हणूनच संतांनी म्हटले आहे की पाप करताना घाबरा.

## कसे पुण्य हवे मोक्षासाठी?

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत मोक्षमार्गावर पोहोचलो नाही, तोपर्यंत पुण्यरूपी मार्गदर्शकाची गरज तर आहेच ना?

**दादाश्री :** हो, पुण्यरूपी मार्गदर्शकासाठी तर लोक शुभाशुभामध्ये पडले आहेत ना! ह्या मार्गदर्शकाकडून सर्वच मिळेल. पण मोक्ष मार्गावर जात असताना त्याचे पुण्य बांधले जाते, पण अशा पुण्याची गरज नाही. मोक्षात जाणाऱ्यांचे पुण्य तर कसे असते? जगात सूर्यनारायण उगवला की नाही, तेही त्यांना माहीत नसते आणि संपूर्ण आयुष्य व्यतीत होते, असे पुण्य असते. तर मग अशा कचऱ्या समान पुण्याचे काय करायचे?

## पापे कधी वजा होत नाहीत

**प्रश्नकर्ता :** हा मार्ग मिळत नाही तोपर्यंत या पुण्याची गरज आहे ना?

**दादाश्री :** हो, हे बरोबर आहे. पण लोकांजवळ पुण्य आहेच कुठे? पुण्य शिल्लक राहिलेले नाही. त्यांची कारण तुमची इच्छा काय

आहे? तर म्हणतात, मी पुण्य केले तर पापाचा उदय येणार नाही. त्यावर भगवंत काय म्हणतात? तू शंभर रुपयांचे पुण्यकर्म बांधले असशील तर तुझ्या खात्यात शंभर रुपयांचे पुण्य जमा होईल. त्यानंतर तू दोन रुपयांएवढे पाप केले, म्हणजे तू एखाद्या माणसाला 'हट, हट, बाजूला हो' असे म्हटले, त्यात थोडासा तिरस्कार आला. तर आता याची जमा-उधारी (बेरीज-वजाबाकी) होत नाही. भगवंत काही कच्ची माया नाहीत. जर पुण्य-पापाची जमा-उधारी झाली असती तर या वाणी लोकांच्या पदरी जरासुद्धा दुःख आले नसते! पण इथे तर सुखही भोगायचे आणि दुःखही भोगायचे, किती समंजस आहेत भगवंत!

**प्रश्नकर्ता :** जर मनुष्य पुण्याच्या रस्त्याने जात असेल तर मग पाप कसे घडते?

**दादाश्री :** हा तर नेहमीचाच नियम आहे ना, की कोणतेही कार्य तुम्ही केले, समजा पुण्याचे कार्य केले तर तुमच्या खात्यात शंभर रुपये जमा होतील आणि पापाचे कार्य असेल तेही थोडेसेच, एकच रुपयाचे असेल, तरीही ते तुमच्या खात्यात उधारीत लिहिले जाईल. म्हणून त्या जमा असलेल्या शंभरातून एकही रुपया कमी होत नाही. असे जर कमी होत गेले असते तर कोणतेही पाप लागलेच नसते. अर्थात दोन्ही (पाप आणि पुण्य) वेगवेगळे राहतात. आणि दोन्हींची फळेही वेगवेगळीच येतात. पापाचे फळ येते तेव्हा ते कडू लागते.

पुण्यामधून पापे काही कमी होत नाहीत. जर कमी झाले असते तर लोक तर खूपच पक्के आहेत, त्यांच्याकडे जरासुद्धा दुःख आले नसते. एकही मुलगा किंवा मुलगी मेली नसती. नोकराने चोरी केली नसती. फक्त मौजमजाच केली असती. हे तर जेव्हा पुण्यकर्मे उदयास येतात तेव्हा ते मोटारीत मौजमजा करवितात, आणि नंतर जेव्हा पापकर्मे घेरतात, तेव्हा तीच मोटार ॲक्सिडन्ट करविते. हे सर्वच घेरतील. आत असेल तेवढे सामान त्याला घेरेल. आत नसेल तर कसे घेरणार? जो काही आहे तो हिशोबच आहे. त्यात काहीही फेरबदल होणार नाही.

## अजाणतेपणी झालेल्या पापांचे ?

**प्रश्नकर्ता :** मी हे पाप केले किंवा पुण्य केले अशी त्याला समजच नसेल तर पाप-पुण्य होते का? त्याला समजतच नसेल की हे मी पाप केले आणि हे मी पुण्य केले, तर मग त्याच्यावर त्याचा काहीच परिणाम होणार नाही ना?

**दादाश्री :** निसर्गाचा नियम असा आहे की तुम्हाला समज असो किंवा नसो, तरी पण त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहत नाही. हे झाड कापले तेव्हा त्यात पाप आहे की पुण्य आहे असे जरी तुम्हाला समजत नसेल पण तरीही झाडाला तर दु:ख झालेच ना? म्हणून तुम्हाला पाप लागले. तुम्ही चार तास उभे राहून रेशनच्या दुकानातून साखरेची पिशवी घेऊन जात असाल, आणि पिशवीला भोक पडले असेल आणि त्यातून साखर खाली सांडत असेल तर साखर कुणाच्या तरी उपयोगी येईल की नाही? खाली असलेल्या मुंग्या साखरेचे दाणे घेऊन जातील आणि मुंग्यांचे भले होईल. आता याला तुम्ही दान केले असे म्हटले जाईल. जरी अजाणतेपणी केले, पण दान तर झालेच ना? जरी तुमच्या जाणीवेत नाही, तरीही दान तर दिले जात आहे ना? आणि मुंग्यांना सुख मिळते ना? त्यामुळे तुमच्याकडून पुण्यकर्म होते. त्याचे फळ सुद्धा अजाणतेपणीत भोगले जाते!

कित्येक असे म्हणतात की अजाणतेपणी पाप झाले तर त्याचे फळ येत नाही? अरे मुर्खा, अजाणतेपणी विस्तवावर हात ठेव म्हणजे समजेल की फळ येते की नाही. जाणतेपणी केलेले पाप आणि अजाणतेपणी केलेले पाप, हे दोन्हीही सारखेच आहेत. परंतु अजाणतेपणी केलेल्या पापाचे फळ अजाणतेपणी आणि जाणतेपणी केलेल्या पापाचे फळ जाणतेपणी भोगावे लागते, एवढाच फरक. बस, हीच पद्धत आहे. हे सर्व नियमानुसार आहे. हे जग पूर्णपणे नियमानुसार आहे, न्यायस्वरूप आहे.

अजाणतेपणी जे घडते त्याचे फळ अजाणतेपणी मिळते. हे मी तुम्हाला समजावून सांगतो.

एक मनुष्य सात वर्ष राज्य करतो आणि दुसरा एखादा मनुष्यही सात वर्ष राज्य करतो. म्हणजे दोन्ही माणसांचे राज्य करणे एकसारखेच आहे, आणि दोघांची राज्येही सारखीच आहेत पण यातील एक मनुष्य वयाच्या तिसऱ्या वर्षी राजगादीवर बसतो आणि दहा वर्षाचा होईपर्यंत राज्य करतो आणि दुसरा मनुष्य वयाच्या विसाव्या वर्षी राजगादीवर बसतो, ते सत्तावीस वर्षाचा होईपर्यंत राज्य करतो, तर यात कोणी खऱ्या अर्थाने राज सुख उपभोगले असे म्हणता येईल? पहिल्याचे सर्व तर बालवयातच गेले, त्याला जर कोणी खेळणी दिली तर तो खेळणीच खेळत बसेल!

अर्थात हे अजाणतेपणी केलेल्या पुण्याचे फळ आहे. त्याने अजाणतेपणी, समजल्याशिवाय, दर्शन घेतले होते म्हणून तो समजल्याशिवाय फळ भोगतो. समजपूर्वक केलेल्याचे फळ समजपूर्वक भोगतो!

त्याचप्रमाणे जागृत मनाने केलेले पाप जागृतिपूर्वक भोगावे लागते आणि अजागृतिपूर्वक केलेले पाप अजागृतिपूर्वक भोगावे लागते. यात बालपणाच्या तिसऱ्या वर्षी जर आई मरून गेली तर ते मूल रडत वगैरे नाही. त्याला तर माहितही नसते. समजतच नसेल, तर काय करेल? आणि पंचवीस वर्षाचा असताना जर आई मरून गेली तर? तर तो जाणतेपणी दुःख भोगतो आणि दुसरा अजाणतेपणी दुःख भोगतो.

## चूक शेठची की आपल्या पापांची?

शेठ आपल्याला बक्षीस देतात, ते आपले 'व्यवस्थित' आहे आणि आपले 'व्यवस्थित' जेव्हा वाईट येते तेव्हा शेठच्या मनात येते की, या वेळी ह्याचा पगार कापायला हवा. म्हणून शेठ पगार कापून घेतो. तेव्हा नोकराच्या मनात येते की हा शेठ नालायक आहे. हा नालायक मला भेटला. परंतु असा गुणाकार करणाऱ्या मनुष्याला माहित नाही की जर हा नालायक असता तर तो मला बक्षीस का देत होता? म्हणजे यात काहीतरी चूक होत आहे. शेठ वाईट नाहीत. हे तर आपले 'व्यवस्थित' बदलले आहे.

हे सर्व पुण्य चालवीत असते. तुला हजार रुपये पगार कोण देतो? पगार देणारा तुझा शेठदेखील पुण्याच्या आधीन आहे. पापे जेव्हा घेरतात तेव्हा कर्मचारी शेठला सुद्धा मारतात.

## जागृती, पुण्य आणि पापाच्या उदयात...

**प्रश्नकर्ता :** लोकांची पुण्याई असेल म्हणून त्यांना ही संपत्ती प्राप्त झाली.

**दादाश्री :** ही सर्व पुण्याईच आहे ना, जबरदस्त पुण्याई, पण संपत्ती सांभाळणे खूप कठीण होते.

**प्रश्नकर्ता :** हो, हे खरे आहे. यात उपाधी तर आहेच ना? सुरुवात तिथूनच होते.

**दादाश्री :** संपत्ती नसेल यासारखे तर दुसरे काहीच नाही.

**प्रश्नकर्ता :** पैसे नसतील, संपत्ती नसेल तर यासारखे काहीच नाही?

**दादाश्री :** हो, त्यासारखे काहीच नाही. संपत्ती तर उपाधी आहे. संपत्ती जर ह्या बाजूला, धर्माच्या बाजूला वळली असेल तर हरकत नाही, नाहीतर उपाधी होते. कुणाला द्यावी? आता कुठे ठेवावी? अशी सर्व उपाधी होते!

म्हणजे अधिक पुण्यही कामाचे नाही. पुण्याई पण संतुलित असेल तरच चांगली. खूप पुण्याई असेल तर शरीर एवढे मोठे होते. पण काय उपयोगाचे? किती किलोचे शरीर? आपल्यालाही उचलावे लागते आणि पलंगालाही उचलावे लागते ना? पलंगही चूं चूं आवाज करत राहतो.

**प्रश्नकर्ता :** पाप आणि पुण्याचा उदय होतो, त्याचा जीवनातील घटनांवर जो काही परिणाम होतो, त्याचे उदाहरण देऊन समजवा ना.

**दादाश्री :** पापाचा उदय होतो तेव्हा प्रथम तर नोकरी जाते. नंतर काय होते? तर पत्नी आणि मुलगा दुकानातून खरेदी करण्यासाठी पैसे मागतात, कारण तशी त्यांना पूर्वीची सवय पडलेली आहे, त्याप्रमाणे

ते म्हणतील दोनशे डॉलर द्या, तेव्हा मग कटकट होते. एक तर इथे नोकरी नाही आणि उगाचच आरडाओरड का करत राहता? दोनदोनशे डॉलर खर्च करायला निघालात? हे असे सर्व चालू होते. रोजचीच कटकट, मग बायको म्हणते, बँकेतून काढून का देत नाही? अहो, पण बँकेत थोडे तरी राहू द्यावे लागतात की नाही? इथे याचे भाडे भरावे लागेल. हे सर्व करावे लागणार की नाही? बँकेत पैसे नाही का भरावे लागणार? पण पत्नी कटकट करते. अगदी डोके फुटून जाईल अशी कटकट करते. ही सर्व लक्षणे तर रात्री झोपूही देत नाहीत. इथे अमेरिकेत तर कित्येकांना असे अनुभव होत असतील आणि ते सांगतातही की पत्नी कर्कशी आहे. भांडखोर आणि कर्कशी आहे असे शब्द बोलतात. अरे, जेवढे कडक शब्द बोलता येतील तेवढे ती बोलते. सोडत नाही ना? ती त्याला सतत हैराण करत असते. एक तर यावेळी बिचाऱ्याची नोकरी सुटलेली असते, काही ठावठिकाणा नसतो, डोके उलटेच चालत असते, त्यात आणि ही त्रास देते. असे घडते की नाही घडत?

**प्रश्नकर्ता :** घडते, घडते.

**दादाश्री :** एखाद्या ठिकाणी घडत असेल की खूप ठिकाणी? नोकरी सुटली असेल असा कोणी मला भेटला तर तो म्हणतो, 'दादा, नोकरी सुटली' काय करू?

नोकरी सुटली असेल तरीही जो चांगल्याप्रकारे दिवस घालवत असेल, त्याला विवेकी मनुष्य म्हणतात. पत्नी आणि स्वतः दोघेही चांगल्या प्रकारे, शांतपणे दिवस काढतात त्यांना विवेकी म्हणतात. नवीन कपडे आणत नाहीत आणि जुने कपडे वापरतात. जोपर्यंत दुसरी नोकरी मिळत नाही तोपर्यंत तितका काळ सांभाळून घेतात. आणि नवऱ्याने सुद्धा उत्साही राहायला हवे, नोकरी सुटली म्हणून घाबरायला नको. हे एवढे गवत कापून किंवा असे काहीतरी करून, संध्याकाळी दहा-वीस डॉलर मिळवले तरी खूप झाले, कमी तर पडणार नाही. तेव्हा म्हणेल, नाही, असे करताना लोकांनी आम्हाला पाहिले तर काय म्हणतील? अरे मुर्खा, लोकांजवळ नोकरी आहे, तुझ्याजवळ नोकरी नाही, तेव्हा

आधी तू घराच्यांचा विचार कर ना. या जगात कुणाचीही अब्रू राहिलेली नाही. सगळ्यांनी कपडे घातले म्हणून अब्रूदार दिसतात आणि जर कपडे काढून टाकले तर सर्व नग्न दिसतील. फक्त ज्ञानी पुरुषच कपडे काढूनही नग्न दिसणार नाहीत. बाकी हे संपूर्ण जग नग्न आहे.

**प्रश्नकर्ता :** एकीकडे नोकरी गेली असेल आणि दुसरीकडे दादा भेटले असतील, तर ते पाप आणि पुण्य दोन्हीही एकत्र आले का?

**दादाश्री :** हा पापाचा उदय चांगला आला की मला दादा भेटले. म्हणून अशा पापाच्या वेळी आपण काय करायला हवे ते दादा सांगतात व आपले सर्व नीट करून देतात. आणि जर पुण्याचा उदय असेल, तेव्हा जर दादा भेटले, तर तेव्हा तुम्हाला दादांकडून काय जाणण्यास मिळाले? परंतु पापाचा उदय असेल तेव्हा दादा म्हणतील, हे बघ भाऊ, अशाप्रकारे व्यवहार कर, बरे का! आता असे कर, तसे कर, असे सर्व सांगतील आणि सर्व नीट करून देतील. अर्थात पापाचा उदय असेल आणि दादा भेटले ते तर खूप चांगले म्हटले जाईल.

## रहस्य, बुद्धीच्या आशयाचे...

प्रत्येक माणसाला स्वतःच्या घरात आनंद वाटतो. झोपडीवाल्याला बंगल्यात आनंद वाटत नाही आणि बंगल्यावाल्याला झोपडीत आनंद वाटत नाही. त्याचे कारण त्याच्या बुद्धीचा आशय. बुद्धीच्या आशयात ज्याने जसे भरून आणले असेल तसेच त्याला मिळते. बुद्धीच्या आशयात जे भरलेले असेल त्याचे दोन फोटो निघतात. (1) पाप फळ आणि (2) पुण्यफळ. बुद्धीच्या आशयाचे प्रत्येकाने विभाजन केले आहे. त्या शंभर टक्यांमधून जास्त टक्के बंगला-गाडी, मुले-मुली आणि पत्नी, या सर्वांसाठी भरलेले आहे. ते सर्व मिळवण्यासाठी पुण्य खर्च झाले आणि धर्मासाठी फक्त एक-दोन टक्केच बुद्धीच्या आशयात भरलेले आहे.

**प्रश्नकर्ता :** बुद्धीचा आशय जरा सविस्तर समजावून सांगा ना, दादा.

**दादाश्री :** बुद्धीचा आशय म्हणजे 'आपल्याला तर बस चोरी करूनच चालवायचे आहे. काळा बाजार करूनच चालवायचे.' तर

कोणी म्हणेल, 'आम्हाला कधीच चोरी करायची नाही.' मग कोणी असेही म्हणेल, 'मला असे उपभोगायचे आहे,' आणि ते उपभोगण्यासाठी त्याला एकांताची जागासुद्धा तयार करून देतो. पण त्यात पाप-पुण्यही काम करते. जे जे काही उपभोगण्याची इच्छा केली असेल ते सर्व त्याला प्राप्त होते. ध्यानी मनी नसणारे असे सुद्धा त्याला मिळते. कारण त्याच्या बुद्धीच्या आशयामध्ये होते आणि जर पुण्याने साथ दिली तर त्याला कोणी पकडूही शकत नाही, वाटेल तेवढा पहारा लावला असेल तरीही! आणि जेव्हा पुण्य संपते तेव्हा सहजच पकडला जातो. लहान मुलगाही त्याला शोधून काढेल की, 'ऐसा घोटाला है इधर!'

दोन चोर चोरी करतात, त्यातील एक पकडला जातो आणि दुसरा आरामात सुटतो, ते काय सूचित करते? बुद्धीच्या आशयात चोरी करायची आहे, असे तर दोन्ही चोर घेऊन आले होते, पण यात जो पकडला गेला त्याचे पापफळ उदयात आले आणि ते वापरले गेले. याउलट दुसरा जो सुटला त्याचे पुण्य त्यात वापरले गेले. त्याचप्रमाणे प्रत्येकाच्या बुद्धीच्या आशयामध्ये जे असते, त्यात पाप आणि पुण्य काम करते. बुद्धीच्या आशयात लक्ष्मी प्राप्त करायची आहे असे भरून आणले असेल, त्यात त्याचे पुण्य वापरले गेले तर पैशांचे ढीग लागतील. दुसरा एखादा बुद्धीच्या आशयात लक्ष्मी प्राप्त करायची आहे असे घेऊन तर आला पण त्यात पुण्य कामी येण्याऐवजी पापफळ समोर आले. त्याला लक्ष्मी तोंडच दाखवत नाही. अहो, हा तर इतका चोख हिशोब आहे की यात कोणाचे जरासुद्धा चालत नाही. पण हे अक्कर्मी असे मानतात की मी दहा लाख कमावले. अरे, यात तर तुझे पुण्य वापरले गेले आणि तेही वाईट मार्गी. त्यापेक्षा तू तुझ्या बुद्धीचा आशय बदल. बुद्धीचा आशय धर्मासाठीच बांधणे उचित आहे. या जड वस्तू गाडी, बंगला, रेडियो या सर्वांचीच भजना केली तर फक्त त्यासाठीच बुद्धीचा आशय बांधण्यासारखा नाही. धर्मासाठीच-आत्मधर्मासाठीच बुद्धीचा आशय ठेवा. आज तुम्हाला जे प्राप्त झाले ते असू द्या. पण आता मात्र आशय बदलून संपूर्ण शंभर टक्के धर्मासाठीच ठेवा.

आम्ही आमच्या बुद्धीच्या आशयात पंच्याण्णव टक्के धर्म आणि

जगत् कल्याणाची भावना रुजविली आहे. इतर कुठेही आमचे पुण्य वापरले गेलेच नाही. पैसे, गाडी, बंगला, मुलगा, मुलगी कुठेही नाही.

आम्हाला जे जे कोणी भेटले आणि ज्ञान प्राप्त करून गेले, त्यांनी दोन-पाच टक्के धर्मासाठी, मुक्तीसाठी ठेवले होते. म्हणून ते आम्हाला भेटले. आम्ही शंभरापैकी शंभर टक्के धर्मात टाकले. म्हणूनच सगळीकडून आम्हाला धर्मासाठी 'नो ऑब्जेक्शन सर्टिफिकेट' मिळाले आहे.

अनंत जन्मांपासून मोक्षाचा *नियाणां* (स्वत:चे संपूर्ण पुण्य पणाला लावून एखाद्या वस्तूची मनोकामना करणे) केला आहे. परंतु पूर्णपणे पक्का *नियाणां* केला नाही. जर मोक्षासाठीच पक्का *नियाणां* केला असेल तर सर्व पुण्य त्यातच वापरले जाते. आत्म्यासाठी जगणे ते पुण्य आहे, आणि संसारासाठी जगणे हे केवळ पाप आहे.

## पसंती, पुण्याच्या वाटणीची...

म्हणजे हे जे पुण्य आहे ना, ते आपण जशी मागणी करू त्यानुसार वाटले जाते. कोणी म्हणेल, मला इतकी दारू पाहिजे, असे पाहिजे, तसे पाहिजे, तर त्यात वाटले जाते. कोणी म्हणेल, मला गाडी आणि घर पाहिजे. म्हणेल, दोन खोल्या असतील तरी चालेल. त्याला दोन खोल्या आणि गाडी वापरायला मिळाली याचे समाधान असते.

त्या लोकांना संतोष वाटत असेल का? छोटया-छोटया झोपड्यांमध्ये राहतात त्या सर्वांना? हो, खरा संतोष. म्हणून तर त्यांना ते घर आवडते. ते असेल तरच आवडते. आता त्या आदिवासींना आणून आपल्या इथे चार दिवस ठेवून पाहा बघू? त्यांना इथे चैनच पडणार नाही, कारण ज्याप्रमाणे त्यांचा बुद्धीचा आशय आहे त्याचप्रमाणे पुण्याचे डिविजन (विभाजन) होते. टेंडरप्रमाणे आईटम मिळते.

**प्रश्नकर्ता :** जर पुण्य-पापाच्याच आधीन असेल तर टेंडर भरायची गरजच कुठे उरली?

**दादाश्री :** हे टेंडर भरले जाते ते पाप-पुण्याच्या उदयाप्रमाणेच भरले जाते. मी म्हणतो की टेंडर भरा, पण मी जाणतो की कशाच्या

आधारे 'टेंडर' भरले जात आहे. या दोन कायद्याच्या बाहेर जाता येणार असे नाही.

मी पुष्कळ जणांना माझ्याकडे 'टेंडर' भरून आणायला सांगतो, पण कोणीही भरून आणलेले नाही. कसे भरतील? हे सर्व पाप पुण्याच्या आधारावर आहे. पापाचा उदय असताना खूप धावपळ करशील तर जे जवळ आहे तेही निघून जाईल. म्हणून घरी जाऊन झोप. आणि साधारण थोडे थोडे काम कर, आणि पुण्याचा उदय असेल तर भटकण्याची गरजच कुठे आहे? घरबसल्या थोडेसे काम केल्यानेही सर्व प्राप्त होऊन जाईल, म्हणूनच मी पाप आणि पुण्य दोन्ही स्थितींमध्ये जास्त धावपळ करायला मनाई करतो.

हे सर्व फक्त समजून घेण्याचीच आवश्यकता आहे.

## पुण्याच्या खेळासमोर व्यर्थ प्रयत्न कशाला?

पुण्य फळ देण्यासाठी सन्मुख झाले आहे तर मग कशासाठी व्यर्थ प्रयत्न करतोस? आणि जर पुण्य फळ देण्यास सन्मुख आलेले नाही, तर उगाच ढवळाढवळ कशासाठी करतोस? सन्मुख आले नसेल आणि तू ढवळाढवळ केलीस तरी काहीही निष्पन्न होणार नाही. आणि सन्मुख आले असेल तर तू कशासाठी ढवळाढवळ करतोस? जेव्हा पुण्य फळ देण्यास तयार होईल तेव्हा वेळच लागणार नाही.

## पाप-पुण्याची लिंक...

एखादा बाहेरील मनुष्य जर माझ्याजवळ व्यवहारासंबंधी सल्ला घेण्यास आला की, 'मी कितीही प्रयत्न केले तरी काहीही निष्पन्न होत नाही.' तेव्हा मी म्हणतो, 'आता तुझ्या पापाचा उदय आहे, म्हणून तू कुणाकडून उसने पैसे घेऊन आलास तर रस्त्यात तुझा खिसा कापला जाईल! तेव्हा आता तू घरी बसून निवांतपणे जे शास्त्र वाचत असशील ते वाच आणि भगवंताचे नामस्मरण करत रहा.'

आम्ही 1968 व्या वर्षी जयगढची जेटी बांधत होतो. तिथे एक कॉन्ट्रॅक्टर माझ्याजवळ येऊन विचारू लागला, 'मी माझ्या गुरु महाराजांकडे

जात असतो. प्रत्येक वर्षी माझे पैसे वाढतच राहतात. माझी इच्छा नाही तरीही वाढतच आहेत, तर ही गुरुकृपा आहे का?' मी त्याला म्हणालो, 'ही गुरुंची कृपा आहे असे समजू नकोस. जर हे पैसे जात राहिले तर तुला वाटेल की, गुरुंना दगड मारू!'

यात गुरु तर निमित्त आहेत. त्यांचे आशीर्वाद निमित्त आहेत. गुरुंनाच हवे असतील तेव्हा चार आणेसुद्धा मिळत नाही ना! म्हणून मग त्याने मला विचारले, 'मग काय करू?' मी म्हणालो 'दादांचे नाव घे.' आत्तापर्यंत तुझी पुण्याची लिंक आली होती. लिंक म्हणजे अंधारात पत्ते उचलले तर चौका येईल, मग पंजा येईल. नंतर पुन्हा उचलशील तर छक्का येईल. तेव्हा लोक म्हणतील की, 'वाह शेठ, वाह शेठ, म्हणावे लागेल.' तसे तुझे एकशे सात वेळा बरोबर पडले आहेत, पण आता बदलणार आहे, म्हणून सावध रहा. आता जर तू काढशील तर सत्तावन्न नंतर तीन येतील आणि तीन नंतर एकशे अकरा येतील! तेव्हा लोक तुला बुद्धू म्हणतील, म्हणून ह्या दादांचे नाव सोडू नकोस. नाहीतर मारला जाशील.

नंतर आम्ही मुंबईला आलो. तो माणूस दोन-पाच दिवसानंतर ही गोष्ट विसरून गेला. त्याचे मग खूप मोठे नुकसान झाले. म्हणून पति-पत्नी दोघांनी ढेकूण मारायचे औषध प्यायले! पण तो इतका पुण्यशाली की त्याचा भाऊच डॉक्टर होता. तो आला आणि हा वाचला! मग तो लगेच गाडी घेऊन माझ्याकडे धावत आला. मी त्याला सांगितले, 'या दादांचे नाव घेत जा, आणि पुन्हा कधीही असे करू नकोस.' तेव्हा मग त्याने नाव घेणे चालू ठेवले. त्याची सर्व पापे धुतली गेली आणि सर्व काही व्यवस्थित झाले.

तुम्ही जेव्हा 'दादा' बोलता त्यावेळी पाप जवळ येतच नाही. चारी बाजूंनी फिरत राहील पण तुम्हाला स्पर्श करणार नाही. तुम्ही डुलकी घ्याल तर मात्र ते स्पर्शून जाईल. रात्री झोपेत स्पर्शत नाहीत. झोप लागत नाही तोपर्यंत बोलत राहिलात आणि सकाळी उठल्याबरोबर बोललात तर मधला वेळ तद्रूप म्हटले जाते.

धर्माची पुण्याई तर अशी आहे की, धर्म प्रत्येक ठिकाणी मदत करतो, वाटेल त्या संकटात मदत करतो. अशी धर्माची पुण्याई असते. पुण्य मदत करतेच. आपले ज्ञान तर वेगळ्याच प्रकारचे ज्ञान आहे, प्रत्यक्ष हजर ज्ञान आहे!

पुण्य पण फाइल आहे आणि पाप पण फाइल आहे. पुण्य प्रमाद करविते आणि पाप जागृत ठेवते. उलट पुण्य तर, हे आईस्क्रीम खा, हे फ्रुट खा, असे सर्व प्रमाद करविते, त्यापेक्षा कडू औषध पाजा ना, म्हणजे जागृत तरी राहील!

## ग्राहक पाठविणारा कोण?

हे सर्व लोक मॉटेल चालवतात, तर या मॉटेलात येणाऱ्यांना कोण पाठवत असेल? तुम्ही मॉटेल चालवता ना, तर कोण पाठवत असेल?

**प्रश्नकर्ता :** माहीत नाही.

**दादाश्री :** तेच तुमचे पुण्य आहे. देव पाठवत नाही, दुसरा कोणीही पाठवित नाही. तुमचे पुण्यच पाठवते. आणि जर पापाचा उदय असेल तर सर्वांच्या मॉटेल भरतील पण तुमचे भरणार नाही. तुमचे मॉटेल जरी सर्वात चांगले असेल तरीही भरणार नाही.

## कुणाला दोष देऊ शकतो का?

अशी कोणतीही गोष्ट नाही की जी या पुण्यवंतांना मिळणार नाही, पण असे पुरेसे पुण्य आणलेले नाही, म्हणून. नाहीतर प्रत्येक गोष्ट जशी हवी तशी मिळेल असे आहे. पण लोक लौकिक ज्ञानात पडलेले आहेत आणि तोपर्यंत कधीही 'वस्तू' (आत्मा) प्राप्त होत नाही. एक तर डोक्याचा थोडा तापट असेल, त्यात जर त्याला असे ज्ञान मिळाले की 'बूधे नार पांसरी' (मारल्याशिवाय स्त्री वठणीवर येत नाही) म्हणजे त्याला हवे होते ते मिळाले! हे जे ज्ञान मिळाले ते ज्ञान त्याला फळ देणार की नाही देणार? मग काय होईल? ज्या स्त्रीच्या पोटी तीर्थंकर जन्मले त्या स्त्रीची तुम्ही काय दशा केली, ते तर पाहा!? किती अन्याय आहे? कारण ज्या स्त्रीच्या पोटी चोवीस तीर्थंकर जन्म

घेतात, बारा चक्रवर्ती जन्म घेतात, वासुदेव जन्म घेतात त्यांच्या बाबतीतही असे केले? तुम्हाला जरी कडू अनुभव झाला, पण त्यात स्त्री जातीची निंदा का करता? तुम्ही बारा रुपये डझनच्या भावाने आंबे घेऊन येता पण ते आंबट निघतात आणि तीन रुपये डझनच्या भावाचे आंबे खूप गोड निघतात. म्हणजे कित्येकदा वस्तू किमतीवर आधारित नसते, तुमच्या पुण्याच्या आधारावर असते. जर तुमच्या पुण्याचा जोर असेल तर आंबे गोड निघतील. आणि आंबे आंबट निघाले त्यात तुमच्या पुण्याचा जोर नव्हता, मग त्यात कुणाला का दोष द्यावा?

अर्थात यात तर पुण्यच कमी पडते, दुसरे काहीच नाही? मोठा भाऊ संपत्ती देत नसेल तर काय त्यात मोठ्या भावाचा दोष आहे? आपले पुण्य कमी पडले. यात कुणाचाही दोष नाही. हा तर पुण्याला सुधारत नाही आणि मोठ्या भावासोबत पाप बांधतो! मग पापाचे द्रोण (ढीग) जमा होतात.

आपल्याला घराची अडचण असेल आणि अशावेळी एखाद्या माणसाने राहण्यासाठी घर देऊन आपली मदत केली, तर जगातील लोकांना त्याच्यावर राग (मोह, आसक्ती) होतो आणि नंतर जेव्हा तो मनुष्य घर परत घेतो तेव्हा त्याच्यावर द्वेष होतो. हा राग–द्वेष आहे. खरे तर, यात राग–द्वेष करण्याची गरज नाही. तो तर निमित्तच आहे देणारा आणि परत घेणारा, दोघेही निमित्त आहेत. जेव्हा तुमच्या पुण्याचा उदय असतो तेव्हा तो देण्यासाठी भेटतो आणि जेव्हा पापाचा उदय असतो तेव्हा घेण्यासाठी भेटतो. त्यात त्या व्यक्तीचा काहीच दोष नाही. तुमच्या उदयाच्या आधारावर आहे. समोरच्या व्यक्तीचा किंचितमात्र दोष नाही. तो तर केवळ निमित्त आहे. असे आपले ज्ञान सांगते, किती सुंदर गोष्ट आहे!

अज्ञानीला तर एखादा गोड गोड बोलला तर त्याच्यावर राग होतो व कडू बोलला तर द्वेष होतो. समोरची व्यक्ती गोड बोलते ते स्वतःचे पुण्य प्रकाशित होत आहे आणि समोरची व्यक्ती कडू बोलते, ते स्वतःचे पाप प्रकाशित होत आहे. म्हणून मुळात ह्या दोन्ही गोष्टीत समोरच्या व्यक्तीचे काहीच देणेघेणे नाही. बोलणाऱ्याला काही देणेघेणे नाही.

समोरची व्यक्ती तर निमित्तच बनते. जो यशाचा निमित्त असतो त्याच्याकडून यश मिळत राहते आणि जो अपयशाचा निमित्त असतो त्याच्याकडून अपयश मिळत राहते. तो फक्त निमित्तच आहे. त्यात कुणाचा दोष नाही.

**प्रश्नकर्ता :** ही सर्व निमित्तेच म्हटली जातात ना?

**दादाश्री :** निमित्ताशिवाय या जगात दुसरी कोणती गोष्ट नाहीच. जे आहे ते हे निमित्तच आहे.

## त्याचा आधार आहे पुण्य आणि पाप

**प्रश्नकर्ता :** कित्येक जण खोटे बोलले तरी ते खरे मानले जाते आणि कित्येक जण खरे बोलले तरीही खोटे मानले जाते. तर हे काय पझल (कोडे) आहे?

**दादाश्री :** असे त्याच्या पाप आणि पुण्याच्या आधारावर घडते. त्याच्या पापाचा उदय असेल तर तो खरे बोलला तरीही त्याचे खोटे ठरवले जाते. आणि जेव्हा पुण्याचा उदय असेल तेव्हा तो खोटे बोलला तरीही लोक त्याचे खरे ठरवतात, वाटेल तसे खोटे केले तरीही चालून जाते.

**प्रश्नकर्ता :** तर त्यात त्याचे काही नुकसान होत नाही का?

**दादाश्री :** नुकसान तर आहे, पण पुढील जन्माचे. या जन्मात तर त्याला मागील जन्माचे फळ मिळाले. आणि हे खोटे बोलले गेले, त्याचे फळ त्याला पुढील जन्मात मिळेल. आता तर त्याने हे बीज पेरले. बाकी, ही काही अंधेर नगरी नाही की वाटेल तसे चालेल!

## या जोडप्यात कोण पुण्यशाली?

एक भाऊ माझ्याजवळ आला होता. तो मला म्हणाला, 'दादा मी लग्न तर केले पण मला माझी बायको आवडत नाही.' तेव्हा मी म्हणालो, 'का बरे, न आवडण्याचे काय कारण?' तेव्हा तो म्हणतो, 'ती जरा पायाने लंगडी आहे, लंगडी चालते.' मग मी विचारले, 'पण तुझ्या बायकोला तू आवडतोस की नाही?' तेव्हा तो म्हणाला, 'दादा,

मी तर आवडेन असाच आहे ना! सुंदर आहे, शिकलो-सवरलो आहे आणि माझ्यात काही शारीरिक व्यंगही नाही.' तेव्हा मी म्हणालो, 'मग यात चूक तुझीच. तू अशी कोणती चूक केली होतीस की तुला लंगडी बायको मिळाली, आणि तिने किती चांगले पुण्य केले होते की तिला तुझ्यासारखा चांगला नवरा मिळाला! अरे, हे तर स्वतःने केलेले स्वतःच्या समोर येते, त्यात समोरच्या व्यक्तीचा दोष का पाहतोस? जा आता, तुझी चूक भोगून घे आणि पुन्हा नवीन चूक करू नकोस.'

## दुःखात पुण्य-पापाची भूमिका...

**प्रश्नकर्ता :** मनुष्याला रोग होतात, त्याचे कारण काय?

**दादाश्री :** स्वतःच अपराध केले होते, पाप केले होते, त्यामुळे हे रोग होतात.

**प्रश्नकर्ता :** पण या छोट्या-छोट्या मुलांनी काय अपराध केले?

**दादाश्री :** सर्वांनीच पाप केलेले, त्याचेच हे सर्व रोग. मागील जन्मी जे पाप केले होते, त्याचे आता फळ आले आहे. लहान मुले दुःख भोगतात, हे सर्व पापाचे फळ आणि शांती व आनंद भोगतात हे पुण्याचे फळ. पाप आणि पुण्याचे फळ, दोन्हीही मिळतात. पुण्य हे क्रेडीट आहे आणि पाप हे डेबिट आहे.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला ह्या जन्मात ज्या काही वेदना होतात, रोग होतो, ते तर आपल्या मागील जन्माच्या कर्माचे फळ आहे, तर मग आपण आत्ता कोणतेही औषध घेतले तरी ते आपल्याला कसे बरे करेल, जर हे व्यवस्थितच आहे तर?

**दादाश्री :** हे जे औषध तुम्ही घेता, तेही 'व्यवस्थित' असेल तरच घेऊ शकाल, त्याशिवाय घेताच येणार नाही. औषध तुम्हाला मिळणारच नाही.

**प्रश्नकर्ता :** आणि बरीच औषधे घेतली तरीही त्या औषधाला गुण येत नाही. बरे वाटत नाही. असेही घडते, दादाजी.

**दादाश्री :** उलट पैसे संपतात आणि मरण्याची वेळ येते. परंतु जेव्हा पुण्य प्रकाशमान असते तेव्हा सहजपणे गप्पा-गोष्टी करता करता टोमॅटोचा रस प्यायला तरीही रोग बरा होतो. अर्थात हे सर्व पुण्याच्या आधारावर आहे. तुमचे पुण्य फळ देण्यास तयार होते तेव्हा सर्व फ्री ऑफ कॉस्ट (विनामूल्य) मिळते आणि जेव्हा पाप फळ देण्यास तयार होते, तेव्हा चांगली वस्तूदेखील उलटा परिणाम देते.

पुण्यामुळे आजारपणात त्रास भोगणे कमी होते. व पापामुळे त्रास वाढतो. पुण्य नसेल तर पूर्ण त्रास भोगावा लागतो.

पुण्य असेल तर चांगले डॉक्टर भेटतात. वेळही जुळते. सर्वच मिळते आणि शांती राहते. रोग डॉक्टरने बरा केला? नाही, रोग तर पापामुळे उत्पन्न झाला होता आणि पुण्याने बरा केला. दुसरे कोण बरे करणार? डॉक्टर तर निमित्त आहे!

**प्रश्नकर्ता :** रोग होणे याला पापाचा उदय म्हणतात का?

**दादाश्री :** मग दुसरे काय? रोग होणे म्हणजे पाप आणि निरोगीपणा म्हणजे पुण्य.

## आयुष्य जास्त असलेले चांगले की कमी?

**प्रश्नकर्ता :** आयुष्य खूप मोठे, दीर्घ आयुष्य असेल तर हे पुण्याचे फळ आहे की पापाचे फळ आहे?

**दादाश्री :** हो, लोकांना शिव्या देण्यासाठी व लोकांची निंदा करण्यासाठी जन्म असेल तर ते पापाचे फळ! स्वतःच्या आत्मकल्याणासाठी किंवा दुसऱ्यांच्या कल्याणासाठी जो जास्त जगतो, ते पुण्याचे फळ.

पुण्यवंताचे आयुष्य दीर्घ असते, थोडे कमी पुण्य असेल तर आयुष्य अर्ध्यावरच संपून जाते! जर एखादा माणूस खूप पापी असेल आणि त्याचे आयुष्य दीर्घ असेल तर? भगवंत काय म्हणाले, पापीचे आयुष्य कसे असले पाहिजे? आपण जर भगवंतांना विचारले की 'पापीचे आयुष्य किती असेल तर ते चांगले म्हणायचे' तेव्हा ते म्हणतात,

'जितका कमी जगेल तितके चांगले.' कारण तो पापाच्या संयोगात आहे, म्हणून जर तो कमी जगेल तर ते संयोग बदलतील! पण तो कमी जगत नाही ना! हे तर लेव्हल दाखवण्यासाठी आपल्याला सांगतात. आणि जास्त जगला, तर शंभर वर्षही पूर्ण करेल आणि इतके सारे पापाचे ढीग जमा करेल की किती खोलवर जाईल ते त्याचे त्यालाच माहीत! आणि पुण्यशाली मनुष्य जास्त जगला तर ते खूप चांगले आहे.

## पुढील जन्माचे गाठोडे कशाचे?

परदेशाची कमाई परदेशातच राहील. गाडी-बंगला, मिल, बायको-मुले सर्व काही इथेच सोडून जावे लागेल. ह्या शेवटच्या स्टेशनवर तर कोणाच्या बापाचेही चालत नाही! केवळ पुण्य आणि पापच सोबत घेऊन जायला देतील. अगदी साध्या भाषेत तुला समजावू तर इथे जे-जे गुन्हे केले त्यांची कलमे सोबत येतील. त्या गुन्ह्यांची कमाई इथेच राहील आणि मग केस चालेल. कलमांच्या हिशोबाने नवीन देह प्राप्त करून पुन्हा नव्याने कमाई करून कर्ज फेडावे लागेल! म्हणून मूर्खा, आधीच सरळ होऊन जा ना! 'स्वदेशात' (आत्म्यात) तर खूपच सुख आहे. पण 'स्वदेश' पाहिलाच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** मनुष्य जन्मात सत्कार्ये केल्यानंतर त्याचा देहविलय झाल्यानंतर, त्या आत्म्याची परिस्थिती कशी असते?

**दादाश्री :** सत्कार्ये केली तर पुण्य बांधले जाते. ते क्रेडीट झाले तर मनुष्यात चांगल्या घरी जन्म मिळतो. राजा होतो किंवा पंतप्रधान होतो, किंवा याहीपेक्षा जास्त सत्कार्ये केली असतील तर देवगतीत जातो. सत्कार्ये करणे याला क्रेडीट म्हणतात, तो मग क्रेडीट भोगण्यासाठी जातो. आणि खराब कार्य करतो तो डेबिट भोगण्यासाठी जातो, मग दोन पायाचे चार पाय होतात! हे तुम्ही एस. ई. झाले आहात, ते क्रेडीटमुळे! डेबिट असेल तर मिलमध्ये नोकरी करावी लागते. दिवसभर कष्ट केले तरीही पुरेसे मिळतच नाही. अर्थात ह्या क्रेडीट-डेबिटच्या आधारे या चार गती आहेत, आणि जर क्रेडीट-डेबिट उत्पन्न झालेच नाही तर मोक्षगतीत जातो.

स्वार्थ केल्याने पापकर्म बांधले जाते आणि नि:स्वार्थपणे केले तर पुण्यकर्म बांधले जाते! पण दोन्हीही कर्मेच आहेत ना? पुण्यकर्माचे फळ आहे सोन्याची बेडी आणि पापकर्माचे फळ लोखंडाची बेडी, पण दोन्हीही बेड्याच आहेत ना?

## फरक, स्वर्ग आणि मोक्ष यांच्यात...

**प्रश्नकर्ता :** स्वर्ग आणि मोक्ष यांच्यात काय फरक आहे?

**दादाश्री :** स्वर्ग म्हणजे इथे जे पुण्य करून जातात, पुण्य म्हणजे चांगली कामे करतात, शुभ कार्ये करतात, म्हणजे लोकांना दान देतात, कुणालाही दु:ख होऊ देत नाहीत, कोणाला मदत करतात, परोपकारी स्वभाव ठेवतात, असे कर्म नाही का करत लोक?

**प्रश्नकर्ता :** करतात.

**दादाश्री :** अशी चांगली कामे केली तर स्वर्गात जातात आणि वाईट कामे केली तर नरकात जातात. आणि जे चांगली-वाईट दोन्ही प्रकारची कामे करतात, पण त्यात जे वाईट कामे कमी करतात ते मनुष्यात येतात. तर अशाप्रकारे चार भागात काम केल्याचे फळ मिळत असते. आणि काम करणारा तर मोक्षाला जाऊ शकत नाही. मोक्षासाठी तर कर्ताभाव असता कामा नये. आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर कर्ताभाव सुटतो आणि कर्ताभाव सुटला म्हणजे मोक्ष होतो.

## पुण्याचे फळ कसे?

पुण्य म्हणजे जमा रक्कम आणि पाप म्हणजे उधार रक्कम. जमा केलेली रक्कम जिथे वापरायची असेल तिथे वापरू शकतो. देवलोकांना नजरकैद असते पण त्यांना मोक्ष तर नसतोच. तुमच्या घरी लग्न प्रसंग असेल तर तुम्ही सर्व काही विसरता. पूर्णपणे मोहात तन्मयाकार असता. आईस्क्रीम खाता तेव्हा जीभ खाण्यात असते. बॅन्ड वाजतो तेव्हा कानाला आवडते. डोळे नवरदेवाला बघण्यात मग्न असतात. नाक अगरबत्ती आणि सेंटमध्ये मुग्ध असते. म्हणजे पाचही इंद्रिये कामात गुंतलेली असतात. मन (विचारांच्या) भानगडीत असते. हे सर्व असेल तिथे

आत्म्याची आठवण नसते. देवलोकांना नेहमी असेच असते. तिथे तर याहून अनेकपटीने विशेष सुख असते, म्हणून त्यांना भानच नसते. आत्मा त्यांच्या लक्षातच नसतो. देवगतीत क्लेश-अशांती आणि ईर्षा असते. देवी-देवताही मग ते सुख उपभोगून कंटाळून जातात! ते कसे? तर जसे लग्नात चार दिवस दररोज लाडूच खाल्ले असतील तर पाचव्या दिवशी खिचडीची आठवण येते, तसे आहे हे! ते (देवी-देवता) सुद्धा इच्छा करतात की केव्हा मनुष्यदेह मिळेल आणि भरतक्षेत्रात चांगल्या संस्कारी कुटुंबात जन्म होईल आणि ज्ञानी पुरुषांची भेट होईल. ज्ञानी पुरुष भेटले तरच सुटका होईल असे आहे. अन्यथा चतुर्गतीची भटकंती तर आहेच.

## पापाचे फळ कसे?

आत्म्यावर असे थर आहेत, आवरणे आहेत की एका मनुष्याला अंधार कोठडीत कोंडून ठेवले आणि त्याला फक्त दोन वेळेस खायला दिले, तेव्हा त्याला ज्या दु:खाचा अनुभव होतो, तसाच अपार दु:खाचा अनुभव या झाड-पानांना एकेंद्रियांपासून ते पंचेंद्रियापर्यंतच्या जीवांना होत असतो. या पाच इंद्रियवाल्या मनुष्यांना जर इतके दु:ख आहे तर ज्यांना कमी इंद्रिये आहेत त्यांना किती दु:ख असेल? पाचापेक्षा जास्त सहा इंद्रियवाले कुणीही नाही. ही झाड-पाने आणि प्राणी, ही तिर्यंच गती आहे. तर ती त्यांना भयंकर कैदेची शिक्षा आहे. मनुष्यगती म्हणजे साधी कैद. आणि नरकगतीत तर भयंकर दु:खे, तिथले वर्णन जसे आहे तसे केले तर ऐकताक्षणीच मनुष्य मरून जाईल. उकळी येताना तांदूळ उसळतात त्याहीपेक्षा लाखपटीचे दु:ख नरकगतीत असते. एका जन्मात पाच-पाच वेळा मरणवेदना आणि तरीही मृत्यू येत नाही. तिथे देह पाऱ्याप्रमाणे असतो. कारण त्यांना वेदना भोगायच्या असतात म्हणून मृत्यू होत नाही. त्यांचे प्रत्येक अंग छेदले जातात आणि पुन्हा जुळतात. वेदना भोगल्यानंतरच सुटका. नरकगती अर्थात जन्मठेपेची शिक्षा.

## पाप-पुण्य यांच्या गलनाच्या वेळी...

तू पापाचे पूरण करतो ते जेव्हा गलन होईल तेव्हा तुला कळेल! तेव्हा तुझे छक्के उडतील! विस्तवावर बसला आहेस असे वाटेल!!

जेव्हा पुण्याचे पूरण करशील तेव्हा कळेल की कशी वेगळीच मजा येते! म्हणून जे जे पूरण कराल ते नीट समजून विचार करून करा की जेव्हा ते गलन होईल तेव्हा त्याचा काय परिणाम होईल! पूरण करतेवेळी सतत लक्ष ठेवा, पाप करतेवेळी कुणाची फसवणूक करून पैसे मिळवताना सतत लक्षात ठेवा की त्याचेही गलन होणार आहे. ते पैसे जरी बँकेत ठेवले तरीही ते जाणारच आहेत. त्याचेही गलन तर होणारच आहे, शिवाय ते पैसे मिळवताना जे पाप केले, जे रौद्रध्यान केले, त्याची कलमे सोबत येतील आणि नंतर जेव्हा त्याचे गलन होईल तेव्हा तुझी काय दशा होईल?

## पुण्य संपले की ते दूर करते ज्ञानींपासून...

पुण्याचा स्वभाव कसा असतो? तर ते खर्च होऊन जाते. कोट्यावधी मण बर्फ असेल पण त्याचा स्वभाव कसा असतो? वितळून जाण्याचा.

तुझा आमच्यासोबतचा सहवासाचा संयोग पुण्याच्या आधारावर आहे. तुझे पुण्य संपले त्यात आम्ही काय करणार? आणि तू मानून बसतोस की हेच संयोग मला हवेत, मग काय होईल? मार खावा लागेल. डोके सुद्धा फुटेल. जेवढा मिळाला तेवढा लाभ. त्या आनंदात राहायचे की माझे पुण्य जागे झाले आहे. तू असे मानतोस की सतत मनाप्रमाणे संयोग मिळावेत?

**प्रश्नकर्ता :** असे नाही.

**दादाश्री :** मग? हे नियमानुसारच आहे ना? की नियमा- बाहेर असेल?

**प्रश्नकर्ता :** नियमानुसारच आहे.

**दादाश्री :** तर मग तसेच मानून बसलो तर काय होईल? हे तर कधी काळी पुण्य जागे होते तेव्हा माझ्याशी भेट होते. नंतर वियोग झाल्यावर कळते. म्हणून जर वियोगाच्या स्थितीमध्ये अनुभव केला असेल तर मग हरकत नाही ना तुम्हाला? पलायन वृत्तीने कर्मापासून सुटका होऊ शकते का? मी बडोद्यात असेन, आणि तू पण बडोद्यात

असशील तरी पण कर्म आपल्याला भेटू देणार नाहीत! हे ज्ञान दिले आहे, ज्यावेळी जे मिळाले ते 'व्यवस्थित', आणि त्याचा समभावाने निकाल कर. बस, फक्त एवढेच.

पुण्य असेल तोपर्यंत दादांजवळ बसण्याची संधी मिळते, त्या पुण्याचे उपकार मानले पाहिजेत. असे नेहमीसाठी घडत असेल का? अशी आशाही कशी ठेवू शकतोस?

## कुसंगाने पापाचा प्रवेश!

या जगात सर्वात मोठा पुण्यशाली कोण? तर ज्याला कुसंग स्पर्शत नाही तो, ज्याला पाप करताना भीती वाटते, तो. याला मोठे ज्ञान म्हणतात!

कुसंगाने पाप घुसते आणि मग पाप चावते. एखादा माणूस रिकामा असेल आणि त्याला जर कुसंग मिळाला, तर कुसंगामुळे निंदा करणे वाढते आणि निंदा केल्याने डाग (दोष) पडतात. ही सर्व जी दुःखे आहेत ती यामुळेच तर आहेत. आपल्याला कुणाविषयीही बोलण्याचा अधिकार आहे का? आपण आपले बघायचे. कुणी दुःखी असेल किंवा सुखी, पण आपल्याला त्याच्याशी काय देणेघेणे आहे? इथे तर राजा असेल त्याचीसुद्धा निंदा करतात. स्वतःचा त्याच्याशी काहीही संबंध नसते, अशी परकी गोष्ट! त्यात आणखी द्वेष आणि ईर्षा, त्याचीच तर ही सर्व दुःखे आहेत. भगवंत काय म्हणतात की तू वीतराग होऊन जा. तू आहेसच वीतराग, मग हे राग-द्वेष कशासाठी? तू नावात पडशील तरच राग-द्वेष आहेत ना? आणि अनामी झालास तर वीतराग झालास!

## सदुपयोग आत्मार्थासाठीच...

असे आहे की, हा पुण्योदय आहे म्हणून घरबसल्या खाण्या-पिण्यास मिळते. त्यामुळे हे सर्व टी.व्ही. पाहणे वैगेरे आहे, खाण्या-पिण्याचाच जर ठिकाणा नसेल तर दिवसभर कष्ट करील की टी.व्ही. बघत बसेल? म्हणजे हा पुण्याचा दुरुपयोग करत आहे. या पुण्याचा सदुपयोग तर असा केला पाहिजे की जो टाइम मिळाला आहे तो आत्म्यासाठी काढायला

हवा. तरी पण असा आग्रह नाही की टी.व्ही. पाहूच नका, थोडावेळ पाहा, पण त्यातून रुची काढून टाकली पाहिजे. असे लक्षात असायला पाहिजे की टी.व्ही. बघितला जात आहे हे चुकीचे आहे.

## परोपकाराने बांधले जाते पुण्य!

**प्रश्नकर्ता :** पुण्य कशाप्रकारे सुधारता येते?

**दादाश्री :** जो येईल त्याला 'या भाऊ, बसा.' अशी विचारपूस करून स्वागत केले. आपल्याजवळ चहा असेल तर चहा आणि नाहीतर जे असेल ते, थोडीशी पोळी असेल तर ती द्या. त्याला विचारावे की, 'भाऊ, थोडी पोळी घ्याल का?' असा प्रेमाने व्यवहार केला तर पुण्य जमा होते. परक्यासाठी केले त्याला पुण्य म्हणतात. स्वतःच्या मुलांसाठी तर सगळेच करतात.

**प्रश्नकर्ता :** पुण्याची वृद्धी व्हावी यासाठी काय करावे?

**दादाश्री :** पूर्ण दिवस लोकांवर उपकार करीत राहावे. हे मनोयोग, वाणीयोग आणि देहयोग लोकांसाठी वापरावे, याचे नाव पुण्य.

## पुण्य-पाप, पति-पत्नीमध्ये...

**प्रश्नकर्ता :** पति-पत्नी दोघेही बहुतेक नेहमी सोबतच असतात, त्यांचा व्यवहार म्हणजे त्या दोघांची कर्मेही एकत्र बांधली जातात, तर त्यांची फळे त्यांना कशाप्रकारे भोगावी लागतात?

**दादाश्री :** फळ तर, जसा तुमचा भाव असेल तसे तुम्ही भोगाल आणि तिचा जसा भाव असेल तसे फळ ती भोगेल.

**प्रश्नकर्ता :** असे आहे का, की पत्नीच्या पुण्यामुळे पतीचे चालत असते? म्हणतात ना की, बायकोच्या पुण्यामुळे ही लक्ष्मी आहे किंवा घरात सर्व काही ठीक आहे, तर खरोखरच असे असते का?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की एक व्यक्ती स्वतःच्या बायकोला खूप मारत होता, म्हणून लोकांनी त्याला समजावले की मूर्खा, तुझ्या पत्नीचे नशीब तर बघ, कशासाठी तिला मारतोस? तिच्या पुण्यामुळे

तर तुला खायला मिळते. त्यानंतर मग ही गोष्ट सुरू झाली. जीवमात्र स्वतःच्या पुण्याचेच खात असतात. प्रत्येक जण आपआपले पुण्यच उपभोगत असतात. त्यात कुणाला काहीही देणेघेणे नसते. किंचितही, एका केसाइतकाही संबंध नसतो.

**प्रश्नकर्ता :** समजा असे दान केले, शुभ कर्म केले, उदाहरणार्थ, पती दान करत असेल त्यात पत्नी सहमत असेल, तिचे सहकार्य असेल, तर दोघांनाही त्यांचे फळ मिळते?

**दादाश्री :** पुरुष अर्थात करणारा आणि सहयोगी असेल अर्थात कर्त्याच्याप्रती अनुमोदना करणारा. करणारा, करविणारा आणि कर्त्याप्रती अनुमोदन करणारा, म्हणजे कुणीतरी तुम्हाला सांगितले असेल की हे काम करा, हे करण्यासारखे आहे, तर त्याला करविणारा असे म्हणतात. तुम्ही करणारे म्हटले जाल आणि पत्नी त्यात विरोध करत नसेल तर ती कर्त्याच्याप्रति अनुमोदन करणारी म्हटली जाते. या सर्वांना पुण्य मिळते. पण करणाऱ्याच्या वाटयाला पन्नास टक्के आणि पन्नास टक्के करविणारा आणि अनुमोदन देणारा, या दोघांमध्ये वाटले जातात.

**प्रश्नकर्ता :** ह्या ताई म्हणतात, आम्हाला पंचवीस टक्केच देता. हे चालणार नाही.

**दादाश्री :** तर मग स्वतः करा. घरातील माणसे तर घरच्या मालकाला म्हणतात की हे जे तुम्ही उलट-सुलट करून पैसे आणता, त्याचे पाप तुम्हालाच लागेल, आम्हाला काही उपभोगायचे नाही. आम्हाला असे काही नको. जो करील तोच भोगेल. म्हणजे हे जे म्हणतात की आम्हाला नको, म्हणजेच त्यांनी अनुमोदन दिले नाही, त्यामुळे त्यापासून ते मुक्त झाले. आणि 'असे करा' म्हटले तर भागीदार होतात, भागीदारी करायची असेल तर ती आपल्या मर्जीची गोष्ट आहे. त्यासाठी काही करार करावा लागत नाही किंवा स्टँम्प लावावा लागत नाही. स्टँम्पशिवायच चालते.

## 'पेले फुटले तरीही पुण्य बांधले?'

कोणी म्हणेल की, 'मला ज्ञान मिळालेले नाही, समकित झाले

नाही, तर आता मी काय करू? मला दुसरे नुकसान ओढवून घ्यायचे नाही!' तर मी त्याला सांगेन की, 'तू हा मंत्र शिकून घे, की जर काचेचे पेले फुटले तर म्हणावे, 'बरे झाले सुटले जंजाळ, चला आता नवीन पेले आणू.' तर त्याच्याने पुण्य बांधले जाते. कारण चिंता करायच्या जागी तो आनंदी राहिला, म्हणून पुण्य बांधले गेले. एवढेच जरी जमले तरी खूप झाले! मला लहानपणापासूनच अशी समज होती, कधीच चिंता केली नाही. कधी असे काही घडले की, लगेच आतून अशी समज यायचीच. हे सर्व शिकवून येत नाही, पण लगेचच सर्व उत्तरे हजर होऊन जातात.

## कोणाच्या निमित्ताने कोणाला मिळते?

**प्रश्नकर्ता :** ज्याच्यासाठी खर्च केले त्याचे पुण्य त्यालाच मिळते ना? करणाऱ्याला मिळत नाही. आपण ज्याच्यासाठी जे कार्य करतो, त्याचे फळ त्यालाच मिळते का? म्हणजे आपण ज्याच्यासाठी जे कार्य करतो, त्याचे पुण्य त्यालाच मिळेल, आपल्याला मिळणार नाही? जो करतो त्याला मिळत नाही? यात खरे काय आहे?

**दादाश्री :** करतो आपण आणि फळ दुसऱ्याला मिळणार? असे कधी ऐकले आहे का?

**प्रश्नकर्ता :** पण त्याच्या निमित्ताने आपण करतो ना?

**दादाश्री :** त्याच्या निमित्ताने आपण करतो, मग त्याच्या निमित्ताने आपण खाल्ले तर काय अडचण आहे? नाही, नाही. तसे नाही. हे तर बनावट करून लोकांना चुकीच्या मार्गावर चढवतात, म्हणे त्याच्या निमित्ताने! त्याला खायचे नसेल आणि आपण खाल्ले तर काय हरकत आहे? हे जग संपूर्णपणे नियमबद्ध आहे! तुम्ही कराल तर तुम्हालाच भोगावे लागेल. दुसऱ्या कोणालाही देणेघेणे नाही.

## वाह-वाह झाली, यात खर्च झाले पुण्य!

**प्रश्नकर्ता :** तुम्ही सांगता त्याप्रमाणेच जर नियम असेल तर हिराबांमागे (दादाश्रींच्या पत्नी) तुम्ही खर्च केले म्हणून तुम्हाला पुण्य मिळेल.

**दादाश्री :** मला काय मिळणार? आम्हाला देणेघेणे नाही, मला तर काही देणेघेणेच नाही ना! त्यात पुण्य बांधले जात नाही. हे तर पुण्य उपभोगले जाते. वाह-वाह केली जाते.

किंवा जर कोणी काही वाईट केले तर म्हणतील 'पाहा ना, मेल्याने सर्व बिघडविले'. म्हणजे इथल्या इथेच सर्व मिळते. हायस्कूल बांधले होते म्हणून इथल्या इथेच वाह-वाह झाली. 'तिथे' काही मिळणार नाही.

**प्रश्नकर्ता :** शाळा तर मुलांसाठी बांधली, मुले शिकतील-सवरतील, सद्विचार उत्पन्न होतील.

**दादाश्री :** ती वेगळी गोष्ट आहे. पण तुमची वाह-वाह झाली, म्हणजे संपले. त्यात पुण्य वापरले गेले.

## टेंडर पास करण्यासाठी पुण्य हवे...

**प्रश्नकर्ता :** हे सर्व लोक पैशाच्या मागे खूप धावतात. तर त्यांचे 'चार्ज' जास्त होणार ना, म्हणून त्यांना पुढील जन्मी लक्ष्मी जास्त मिळायला हवी ना?

**दादाश्री :** आपण लक्ष्मी धर्मकार्यासाठी वापरली पाहिजे, असे जर त्यांनी चार्ज केले असेल तर त्यांना जास्त मिळेल.

**प्रश्नकर्ता :** पण मनात असे भाव करत राहिला की मला लक्ष्मी मिळावी, असे जे भाव चार्ज केले, तर पुढच्या जन्मी निसर्ग त्याला लक्ष्मी पुरवणार नाही का?

**दादाश्री :** नाही, नाही. त्याच्याने लक्ष्मी मिळत नाही. लक्ष्मी मिळण्यासाठी जे भाव करतो ना, त्यामुळे तर लक्ष्मी मिळणार असेल तीसुद्धा मिळणार नाही. उलट अंतराय पडतात. लक्ष्मीची आठवण केल्याने लक्ष्मी मिळत नाही, ती तर पुण्य केल्याने मिळते.

'चार्ज' म्हणजे पुण्याचे चार्ज केले तर लक्ष्मी मिळते. तेसुद्धा फक्त लक्ष्मीच मिळत नाही. पुण्याच्या चार्जमध्ये जशी इच्छा असेल, जसे की मला लक्ष्मीची खूप गरज आहे, तर त्याला लक्ष्मी मिळते.

कोणी म्हणेल, की मला तर फक्त धर्मच पाहिजे, तर फक्त धर्मच मिळेल, आणि पैसे जवळ नसतीलही. अर्थात आपण ज्याप्रमाणे पुण्याचे टेंडर भरले असेल की मला असे (अमुक) पाहिजे. तर ते मिळण्यात आपले पुण्य वापरले जाते.

कोणी म्हणेल, 'मला बंगला पाहिजे, गाडी पाहिजे, असे पाहिजे, तसे पाहिजे.' तर पुण्य त्यात वापरले जाते. मग धर्मासाठी काहीच उरत नाही. आणि कोणी म्हणेल, मला धर्मच पाहिजे, गाड्या नकोत. मला तर एवढया दोन खोल्या असतील तरीही चालेल पण धर्मच जास्त पाहिजे. तर त्याला धर्म जास्त मिळेल आणि दुसरे सर्व कमी मिळेल. अर्थात प्रत्येक जण स्वत:च्या हिशोबाने पुण्याचे टेंडर भरतात.

## दान म्हणजे पेरून कापणे!

**प्रश्नकर्ता :** जर आत्मा आणि दान यांचा काही संबंधच नाही तर मग दान करणे हे गरजेचे आहे की नाही?

**दादाश्री :** दान म्हणजे काय? तर आधी द्या, नंतर घ्या. हे जग प्रतिध्वनीसारखे आहे. तुम्ही जसे कराल तसे प्रतिध्वनी येतील, त्याच्या व्याजासकट. म्हणजे तुम्ही द्या आणि घ्या. हे जे तुम्ही मागील जन्मी दिले होते, चांगल्या कामासाठी पैसे वापरले होते, असे काहीतरी केले होते, त्याचे तुम्हाला फळ मिळाले, परंतु जर आता पुन्हा असे केले नाही तर मग सर्व धुळीस मिळेल. आपण शेतातून चारशे मण गहू घेऊन तर आलो, पण मग त्यातील पन्नास मण जर पेरायला गेलो नाही तर?

**प्रश्नकर्ता :** तर नवीन उगवणार नाही.

**दादाश्री :** असे आहे हे सर्व. म्हणून द्यावे. त्याचा प्रतिध्वनीच येईल आणि परत येईल, अनेकपटीने होऊन परत येईल. मागील जन्मी दिले होते म्हणून तर अमेरिकेला यायला मिळाले, नाही तर अमेरिकेत येणे सोपे आहे का? किती पुण्य केली असेल तेव्हा तर या विमानात बसायला मिळते. कित्येक लोकांनी तर विमान पाहिलेसुद्धा नाही!

**प्रश्नकर्ता :** उदाहरार्थ, इंडियात कस्तुरभाई लालभाई यांची पिढी

असेल, तर त्यांच्या दोन, तीन, चार पिढ्यांपर्यंत पैसे चालत राहतात, त्यांच्या मुलांच्या मुलांपर्यंत. परंतु इथे अमेरिकेत कसे आहे की पिढी असते पण जास्तीत जास्त सहा-आठ वर्षातच सर्व संपुष्टात येते, किंवा मग पैसे असतील ते संपून जातात आणि नसतील तर परत येतातसुद्धा. तर याचे काय कारण असेल?

**दादाश्री :** असे आहे की, तिथले जे पुण्य आहे ना, इंडियाचे पुण्य, ते गाढ पुण्य असते, कितीही धुतले तरी जात नाही, आणि पापसुद्धा असे गाढ असते की कितीही धूत राहिलो तरी संपत नाही. मग ते वैष्णव असो किंवा जैन असो, पण त्यांनी पुण्य इतके घट्ट बांधलेले असते की कितीही धूत राहिलो तरीही संपत नाही. पेटलाद शहराचे ते दातार शेठ, रमणलाल शेठ, त्यांची संपन्नता सात-सात पिढ्यांपर्यंत राहिली. खोऱ्याने उपसून उपसून पैसे देत असत लोकांना, तरीही कधी कमी पडले नाही. त्यांनी जबरदस्त पुण्य बांधले होते, खरी पुण्याई. आणि पापेसुद्धा अशीच घट्ट बांधतात, की सात-सात पिढ्यांपर्यंत गरिबी जात नाही. अपार दुःखे भोगतात, अर्थात एक्सेसही होते आणि मिडीयमही राहते.

इथे (अमरिकेत) तर उतूही येते, आणि पुन्हा बसूनही जाते आणि पुन्हा उतू येते. बसून गेल्यानंतरही पुन्हा उतू येते. इथे वेळ लागत नाही. आणि तिथे (इंडियात) बसून गेल्यानंतर पुन्हा उतू येण्यास खूप वेळ लागतो. पूर्वी तर तिथे सात-सात पिढ्यांपर्यंत चालायचे. पण आता सर्व पुण्य कमी होऊन गेले आहे. कारण काय असते की कस्तुरभाईच्या घरी जन्माला कोण येतो? तर त्यांच्यासारखाच पुण्यशाली असेल तोच तिथे जन्माला येतो. मग त्यांच्याही घरी कोण जन्माला येतो? तर तसाच पुण्यशाली मग तिथे जन्माला येतो. म्हणजे तिथे कस्तुरभाईचे पुण्य काम करत नाही, तर त्यांच्यासारखा दुसरा तिथे आला असेल त्याचे पुण्य तिथे काम करते, म्हणजे म्हटली जाते कस्तुरभाईचीच पिढी. आणि आत्ता तर असे पुण्यशाली आहेतच कुठे? गेल्या पंचवीस वर्षात तर असे खास कोणी नाही.

## दोन नंबरच्या पैशांचे दान...

**प्रश्नकर्ता :** दोन नंबरच्या पैशांचे दान केले तर ते नाही चालणार का?

**दादाश्री :** खरे तर, दोन नंबरचे दान चालणार नाही. पण तरीही एखादा माणूस उपाशी मरत असेल आणि त्याला दोन नंबरचे दान दिले तर त्याला खाण्यासाठी चालेल, पण दोन नंबरच्या पैशात कायद्यानुसार काही अडचणी येतात, दुसरी कुठली हरकत नाही. ते पैसे जर हॉटेलवाल्याला दिले तर तो घेणार की नाही घेणार?

**प्रश्नकर्ता :** घेणार.

**दादाश्री :** हो, तो व्यवहार सुरूच होतो.

**प्रश्नकर्ता :** आत्ताच्या काळात दोन नंबरचा पैसा धर्मकार्यात वापरला जात आहे, तर त्यातून लोकांना पुण्य उपार्जन होते का?

**दादाश्री :** नक्कीच होते ना! त्याने तेवढा त्याग केला ना! स्वत:जवळ आलेल्या पैशांचा त्याग केला! पण हेतू अनुसार मग ते पुण्य तसेच होऊन जाते, हेतूनुसार! म्हणजेच हे पैसे दिले त्यात फक्त एकच वस्तू बघितली जात नाही. पैशांचा त्याग केला हे तर निर्विवाद आहे. पण पैसे कुठून आले? हेतू काय आहे? हे सर्व प्लस-मायनस होऊन जे बाकी उरते, ते त्याचे. त्याचा हेतू काय आहे की सरकार घेऊन जाईल त्यापेक्षा इथे दान द्यावे!

## शास्त्र वाचन, पापक्षय करते का?

**प्रश्नकर्ता :** सत्शास्त्रांच्या वाचनाने पापांचा क्षय होऊ शकत नाही का?

**दादाश्री :** नाही, त्यामुळे पुण्य नक्कीच बांधले जाते, पण पापांचा क्षय होत नाही. दुसरे नवीन पुण्य बांधले जाते, त्याला पुण्यानुबंधी पुण्य म्हणतात. सत्शास्त्रांचा अभ्यास करतो, त्यातून स्वाध्याय होतो म्हणून चित्ताची एकाग्रता, मनाची एकाग्रता खूप सुंदर होते.

## पापे धुतली जातात प्रतिक्रमणाने

**प्रश्नकर्ता :** पाप धुता येत असेल तर?

**दादाश्री :** असे धुता येत नाही. ज्ञानी पुरुष जोपर्यंत मार्ग दाखवत नाहीत तोपर्यंत पाप धुणे जमत नाही. पाप धुणे म्हणजे काय? तर प्रतिक्रमण करणे. अतिक्रमण म्हणजे पाप. व्यवहाराच्या बाहेर कोणतीही क्रिया केली त्याला पाप म्हणतात, अतिक्रमण म्हणतात. म्हणून त्याचे प्रतिक्रमण करावे लागते. त्याने ती सर्व पापे धुतली जातात, नाहीतर पापे धुतली जात नाहीत.

## पश्चात्ताप कधीही खोटा नसतो

**दादाश्री :** असे प्रतिक्रमण तुम्ही किती करता?

**प्रश्नकर्ता :** कुणाला दु:ख झाले की लगेच पश्चात्ताप करतो.

**दादाश्री :** पश्चात्ताप म्हणजे तर आपल्याला जी वेदना (दु:ख) होते ते. पश्चात्तापाला प्रतिक्रमण म्हटले जात नाही. तरी पण ते चांगलेच आहे.

**प्रश्नकर्ता :** एका बाजूने पाप करत राहतो आणि दुसऱ्या बाजूने पश्चात्ताप करत राहतो. असे तर चालतच राहील.

**दादाश्री :** तसे होत नसते. जो माणूस पाप करतो आणि नंतर जर त्याने पश्चात्ताप केला तर तो खोटा पश्चात्ताप करूच शकत नाही. त्याचा पश्चात्ताप खराच असतो. पश्चात्ताप खराच असतो, म्हणून कांद्याची एक पाकळी निघून जाते, पण तरीसुद्धा कांदा अख्खाच्या अख्खाच दिसतो. नंतर परत दुसरी पाकळी निघते. पश्चात्ताप कधीच वाया जात नाही. प्रत्येक धर्माने पश्चात्ताप करण्याचेच सांगितले आहे. ख्रिश्चनांमध्येही पश्चात्ताप करण्याचेच सांगितले आहे.

## पापांचे प्रायश्चित्त कशाप्रकारे?

**प्रश्नकर्ता :** दर रविवारी देवाच्या मंदिरात जाऊन आपण केलेल्या पापांची कबुली केली तर पापे माफ होऊन जातील ना?

**दादाश्री :** अशा प्रकारे जर पापे धुतली जात असती तर कोणी आजारी पडलेच नसते ना? मग तर काही दु:खच राहिले नसते ना? पण इथे तर अपार दु:खे असतात. माफी मागण्याचा अर्थ हा आहे की तुम्ही जेव्हा माफी मागता तेव्हा तुमच्या पापाचे मूळ जळून जाते, म्हणून ते पुन्हा उगवत नाही, पण त्याचे फळ तर भोगावेच लागेल ना!

**प्रश्नकर्ता :** काही काही मुळे तर पुन्हा नव्याने उगवतात.

**दादाश्री :** नीट जळली नसतील तर पुन्हा उगवतील. मुळे कितीही जळली तरीही फळ तर भोगावेच लागते. भगवंतांनासुद्धा भोगावे लागते! श्रीकृष्णालाही इथे (पायाला) बाण लागला होता. त्यात कुणाचेही चालत नाही, मला सुद्धा भोगावे लागते!

प्रत्येकाच्या धर्मात माफी मागण्याची पद्धत असते. ख्रिश्चन, मुस्लिम, हिंदू सर्वांमध्येच असते, पण वेगवेगळ्या प्रकारे असते.

**प्रश्नकर्ता :** पाद्री (ख्रिश्चनांचे धर्मगुरु) सुद्धा म्हणतात की आमच्याजवळ कन्फेशन (कबूल) करून जा, तर सर्व पापे नष्ट होऊन जातील.

**दादाश्री :** कन्फेस करणे हे काय सोपे आहे? तुम्ही कन्फेस करू शकाल का? तिथे तर रात्रीच्या अंधारात कन्फेशन करतात. ती व्यक्ती उजेडात चेहरा दाखवत नाही. म्हणेल 'मी रात्रीच्या अंधारात कन्फेशन करेन.' आणि माझ्याजवळ तर चाळीस हजार लोकांनी, मुलींनी, स्वत:चे सर्व कन्फेशन केले आहे. एकूण एक गोष्टींचे कन्फेस! असे लिहूनही दिले आहे सर्व. अगदी उघडपणे कन्फेश! मग तर पापे नष्ट होणारच ना? कन्फेस करणे सोपे नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे प्रतिक्रमण आणि कन्फेस, या दोन्ही गोष्टी सारख्याच झाल्या ना?

**दादाश्री :** नाही, दोन्ही सारख्या नाहीत. प्रतिक्रमण तर जेव्हा अतिक्रमण होते, तेव्हा (दोष) धूत राहायचे. मग पुन्हा डाग पडला तर पुन्हा धुवायचे, आणि पाप कन्फेस करणे, जाहीर करणे, ही तर वेगळी गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण आणि पश्चात्ताप यात नेमका काय फरक आहे?

**दादाश्री :** पश्चात्ताप हे नामनिर्देश नसलेले आहे. ख्रिश्चन लोक रविवारी चर्चमध्ये जाऊन पश्चात्ताप करतात. जी जी पापे केली त्याबद्दल सामूहिक पश्चात्ताप करतात. आणि प्रतिक्रमण म्हणजे तर ज्याने गोळी मारली, ज्याने अतिक्रमण केले तो प्रतिक्रमण करतो. अगदी त्याचक्षणी! शूट ऑन साईट (पाहिल्याबरोबर दोष संपवणे) त्याला धुऊन टाकतो. त्याला भाव प्रतिक्रमण म्हणतात.

## पश्चात्तापाने शिक्षा कमी होते

**प्रश्नकर्ता :** पापांना निर्मूळ करण्यासाठी प्रायश्चित हाच उत्तम मार्ग आहे. ही खूप सुंदर गोष्ट आहे, असे पुराणात सत्पुरुषांनी म्हटले आहे. तर काय माणसाने खून केल्यानंतर त्याबद्दल पश्चात्ताप केला तर त्याला माफी मिळू शकते का?

**दादाश्री :** खुनी माणूस खून केल्यावर खुश झाला तर त्याची शिक्षा जी एका वर्षाची असेल ती तीन वर्षाची होऊन जाते. आणि जर खुनी माणूस खून केल्यानंतर पश्चात्ताप करत असेल तर जी शिक्षा एका वर्षाची होणार असेल ती सहा महिन्यांची होऊन जाते. कोणतेही चुकीचे कार्य केल्यानंतर खुश होत असाल तर ते कार्य तीन पटीने वाढून फळ देईल. आणि जर चुकीचे कार्य केल्यानंतर पश्चात्ताप कराल की, 'हे मी चुकीचे काम केले', तर शिक्षा कमी होईल.

## ज्ञानींच्या ज्ञानाने कर्मांपासून सुटका

**प्रश्नकर्ता :** पुष्कळदा व्यवहारात वेगवेगळ्या प्रकारची कर्मे करावी लागतात, ज्यांना खराब कर्मे किंवा पापकर्मे म्हणतात. तर त्या पापकर्मांपासून आपण कशाप्रकारे वाचू शकतो?

**दादाश्री :** पापकर्मांसमोर त्याला जितके ज्ञान असेल, ते ज्ञान त्याला मदद करते. आपल्याला इथून स्टेशनला जायचे असेल, तर स्टेशनला जाण्याचे ज्ञान जर आपल्याजवळ असेल तर ते (ज्ञान)

आपल्याला पोहोचवेल. पापकर्मांपासून कशाप्रकारे वाचू शकू ? तर जेवढे ज्ञान असेल, पुस्तकात किंवा इतर कुणाजवळ हे ज्ञान नसते. ते तर व्यावहारिक ज्ञान असते. निश्चय ज्ञान हे फक्त ज्ञानींजवळ असते. पुस्तकात निश्चय ज्ञान नसते. ज्ञानींच्या हृदयात दडलेले असते. ते निश्चय ज्ञान जेव्हा आपण वाणीरूपाने ऐकतो तेव्हा आपली सुटका होते. नाहीतर पुस्तकात तर व्यावहारिक ज्ञान असते, ते ज्ञानही पुष्कळ खुलासे (स्पष्टीकरण) देऊ शकते. त्याच्याने बुद्धी वाढते. मतिज्ञान वाढत जाते. श्रुतज्ञानाने मतिज्ञान वाढते, आणि मतिज्ञान पापापासून कसे सुटावे त्याचा उलगडा करते. बाकी, याशिवाय दुसरा काही उपाय नाही, आणि दुसरे म्हणजे प्रतिक्रमण केले तर सुटता येईल. पण प्रतिक्रमण कसे असले पाहिजे ? हवे ? 'शूट ऑन साईट' असले पाहिजे. दोष झाल्याबरोबर लगेच प्रतिक्रमण करण्यात आले तर सुटका होईल.

## करा ह्या विधी, पापोदया वेळी!

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्याने कदाचित नवीन पापे बांधली जाणार नाहीत, पण जुनी पापे तर भोगावीच लागतील ना ?

**दादाश्री :** प्रतिक्रमणाने नवीन पापे होणार नाहीत, हे तुमचे म्हणणे बरोबर आहे, आणि जुनी पापे तर भोगावीच लागतात. पण तरी हे भोगणे कमी होऊ शकते, त्यासाठी मग मी उपाय दाखवला आहे की तीन मंत्र एकत्र म्हणा. त्यानेसुद्धा भोगण्याचे फळ हलके होऊन जाईल. जसे एखाद्या माणसाच्या डोक्यावर दीड मणाचे ओझे असेल आणि बिचारा खूप कंटाळून गेला असेल, पण त्यावेळी जर त्याला अचानक एखादी वस्तू दिसली आणि त्यावर त्याची दृष्टी पडली तर तो स्वत:चे दु:ख विसरून जातो, डोक्यावर ओझे आहे तरी पण त्याला दु:ख कमी वाटते. तसेच हे जे त्रिमंत्र आहेत ना, ते म्हटल्याने त्याला ते ओझे जाणवणारच नाही.

मंत्राचा खरा अर्थ काय ? मंत्र म्हणजे जे मनाला शांत ठेवते ते. भगवंताची भक्ती करताना संसारात विघ्न येऊ नयेत यासाठी भगवंताने तीन मंत्र दिले आहेत (1) नवकार मंत्र (2) ॐ नमो भगवते वासुदेवाय

(3) ॐ नमः शिवाय. हे मंत्र हेल्पिंग आहेत. तुम्ही कधी त्रिमंत्र म्हटले होते का? एकदाच त्रिमंत्र म्हटले होते? तर आता जरा जास्त वेळा म्हणाल तर सर्व हलके होऊन जाईल आणि तुम्हाला भीती वाटत असेल तर ती देखील बंद होईल.

पुण्याचा उदय काय काम करतो? आपण ठरवल्याप्रमाणेच सर्व गोष्टी होऊ देतो. पापाचा उदय काय करतो? आपण ठरवलेले सर्व उलटे करून टाकतो.

## पाप धुतल्याची प्रतीती!

**प्रश्नकर्ता :** आम्ही केलेली पापकर्मे आता आम्ही कशाप्रकारे धुऊ?

**दादाश्री :** पापकर्मांचे जितके डाग लागले आहेत तितकी प्रतिक्रमणे करावी, ते डाग पक्के असतील तर पुन्हा धूत राहायचे. पुन्हा पुन्हा धूत राहायचे.

**प्रश्नकर्ता :** तो डाग निघाला की नाही हे कसे कळेल?

**दादाश्री :** ते तर जेव्हा आतून मन स्वच्छ होऊन जाते तेव्हा कळते. चेहऱ्यावर मस्ती येते. डाग निघूनच गेला हे तुम्हाला कळत नाही का? का नाही कळणार? त्यात काय अडचण आहे? आणि जरी धुतला गेला नाही तरी हरकत नाही. तुम्ही प्रतिक्रमण करत राहा ना! साबण लावतच राहा ना! खरोखर तुम्ही पापाला ओळखता का?

समोरच्या व्यक्तीला दुःख होते ते पाप आहे. कोणत्याही जीवाला, मग तो मनुष्य असो, प्राणी असो किंवा झाड असो. विनाकारण झाडाची पाने तोडत राहिलो तर त्यालाही दुःख होते, म्हणून त्याला पाप म्हटले जाते. तेव्हा कोणाला जरासुद्धा, किंचितमात्र दुःख होणार नाही असे वागले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** पण मनुष्य त्याच्या स्वभावाप्रमाणे वागत असेल तरीही त्यात त्याला पुण्य-पाप लागते का?

**दादाश्री :** समोरच्याला दुःख झाले तर पाप लागते. तो

स्वभावाप्रमाणे वागतो, पण त्याला हे समजायला हवे की माझ्या स्वभावामुळे समोरच्याला दु:ख होत आहे, म्हणून मी त्याची माफी मागितली पाहिजे, की माझा स्वभावच वाकडा आहे आणि त्यामुळे त्याला दु:ख झाले आहे, म्हणून मी माफी मागतो.

आपण जर प्रतिक्रमण केले तर खूप चांगले. आपले कपडे स्वच्छ होतील ना? आपल्या कपड्यात मळ का राहू द्यावा? दादांनी असा मार्ग दाखवला आहे तर मग स्वच्छ का नाही करायचे?

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमण जेव्हा मागील जन्माचे काही हिशोब असतील तेव्हाच होते ना?

**दादाश्री :** हो, तेव्हाच होते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आपण प्रतिक्रमण करतो तेव्हा मागील सर्व जन्मांच्या पापांसाठी प्रतिक्रमण होत असते का?

**दादाश्री :** तो हिशोब आपण संपवतो. म्हणून आपले लोक 'शूट ऑन साईट' प्रतिक्रमण करतात, त्यामुळे त्यांचे दोष लगेच निर्मळ होऊन जातात.

## शेतीचे पाप धुण्याची विधी!

**प्रश्नकर्ता :** आम्ही तर शेतकरी आहोत. आम्ही जेव्हा तंबाखूचे पीक घेतो तेव्हा आम्हाला प्रत्येक रोपट्याचा कोंब म्हणजे त्याचे डोके तोडावेच लागते. त्याचे पाप तर लागतेच ना? तेव्हा या पापाचे निवारण कशाप्रकारे करावे?

**दादाश्री :** त्यासाठी तर मनात असे वाटायला हवे की जळो, हा व्यवसाय माझ्या वाट्याला का बरे आला? बस, एवढेच. रोपट्याचा कोंब तोडून टाकायचा. पण मनात, 'हा व्यवसाय माझ्या वाट्याला का आला?' असा पश्चात्ताप झाला पाहिजे. आणि असे करता कामा नये, असे वाटायला हवे, बस.

**प्रश्नकर्ता :** पण हे पाप तर होणारच ना?

**दादाश्री :** ते तर आहेच. ते तुम्ही बघू नका. जे पाप होत आहे त्या पापाला तुम्ही बघू नका. पण असे व्हायला नको, असे तुम्ही निश्चित करा. निश्चय केला पाहिजे. हा व्यवसाय का मिळाला? दुसरा चांगला व्यवसाय मिळाला असता तर आपण असे केले नसते. जोपर्यंत हे माहीत नसते तोपर्यंत पश्चात्ताप होत नाही. खुश होऊन रोपट्याला उपटून फेकून देतो. आम्ही सांगितल्याप्रमाणे करा ना, मग तुमची सगळी जबाबदारी आमच्यावर. रोपटे उपटून फेकून देता, त्याला हरकत नाही, पण पश्चात्ताप मात्र झालाच पाहिजे की असे काम माझ्या वाट्याला का आले?

**प्रश्नकर्ता :** कापसावर औषध फवारावे लागते तर काय करावे? त्यात हिंसा तर होतेच ना?

**दादाश्री :** नाईलाजाने जे कार्य करावे लागते, ते प्रतिक्रमणाच्या अटीवरच करावे. तुम्हाला हा संसार व्यवहारात कशा प्रकारे चालावे ते समजत नाही. ते आम्ही तुम्हाला शिकवू, मग नवीन पापे बांधली जाणार नाहीत.

शेती कामात जीवजंतू मारले जातात, त्याचे दोष तर लागणारच ना? म्हणून शेतकऱ्यांनी दररोज पाच-दहा मिनिटे देवाजवळ अशी प्रार्थना करावी की 'हे सर्व दोष झालेत, त्याबद्दल मी माफी मागतो.' शेतकरी बंधूंना आम्ही असे सांगतो की तुम्ही जो व्यवसाय करता, त्यात जीवजंतू मरतात. तर त्यासाठी अशा प्रकारे प्रतिक्रमण करत जा.

## शंभर टक्के धुतली जातात पापे!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे माफी मागितल्याने आपल्या पापांचे निवारण खरोखर होते का?

**दादाश्री :** त्यानेच पापांचे निवारण होते, दुसरा कुठलाही मार्ग नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग पुन्हा पुन्हा माफी मागायची आणि पुन्हा पुन्हा पाप करत राहायचे?

**दादाश्री :** पुन्हा पुन्हा माफी मागायची सूट आहे. पुन्हा पुन्हा माफी मागावी लागेल. हो, शंभर टक्के सुटण्याचा मार्ग हाच आहे! माफी मागितल्याशिवाय या दुनियेतून इतर कुठल्याही मार्गाने सुटू शकणार नाही. प्रतिक्रमणाने सर्व पापे धुतली जातात.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्याने पापांचा नाश होतो, त्यामागे काय सायन्स आहे?

**दादाश्री :** अतिक्रमणाने पापे होतात आणि प्रतिक्रमणाने पापांचा नाश होतो. मागे वळल्याने पापांचा नाश होतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग कर्मांचा नियम कुठे लागू पडतो? आपण माफी मागतो आणि कर्मे सुटून जातात तर मग यात कर्माचा नियम नाही राहिला ना?

**दादाश्री :** हाच कर्माचा नियम! माफी मागणे हाच कर्माचा नियम!!

**प्रश्नकर्ता :** मग सर्वजण पाप करत राहतील आणि माफी मागत राहतील.

**दादाश्री :** हो, पाप करत राहायचे आणि माफी मागत राहायची, हेच भगवंतांनी सांगितले आहे.

**प्रश्नकर्ता :** पण खऱ्या मनाने माफी मागायची ना?

**दादाश्री :** माफी मागणारा खऱ्या मनानेच माफी मागत असतो आणि खोटया मनाने माफी मागितली तरी पण चालवून घेतली जाईल. पण तुम्ही माफी मागा.

**प्रश्नकर्ता :** तर मग त्याला तशी सवयच लागेल ना?

**दादाश्री :** सवय लागली तर लागू दे पण माफी मागा. माफी मागितल्याशिवाय तर सुटकाच नाही हे समजून घ्या! माफीचा काय अर्थ आहे? त्याला प्रतिक्रमण म्हटले जाते आणि दोषाला काय म्हटले जाते? अतिक्रमण.

कर्माचा नियम काय आहे? अतिक्रमण केले तर त्याचे प्रतिक्रमण करा. समजले का तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** म्हणून तुम्ही अवश्य माफी मागा. आणि ह्या शहाणपणाच्या, दीडशहाणपणांच्या गोष्टी सोडा. कोणी चुकीचे करत असेल आणि माफी मागत असेल तर मागू द्या ना! 'धिस इज कम्प्लीट लॉ.' (हा संपूर्ण कायदा आहे).

## पश्चात्तापाचा सर्वश्रेष्ठ साबण

**प्रश्नकर्ता :** पाप दूर करण्यासाठी प्रायश्चित्ताशिवाय दुसरा कोणता उपाय आहे का?

**दादाश्री :** पाप दूर करण्यासाठी प्रायश्चित्ताशिवाय दुसरा कोणताच उपाय नाही. ही सर्व पापे म्हणजे काय आहे? आपण पाप कशाला म्हणत असतो? तर तुम्ही जे हे सर्व करता ते करण्यास हरकत नाही. हे सर्व इथे बसलेले आहेत. आता कुणाला काही हरकत नाही. त्यात जर कोणी म्हणाला की 'तुम्ही का उशिरा येता?' असे जर तो आपल्याला म्हणाला, तर त्याने अतिक्रमण केले असे म्हटले जाईल. कारण लोकांना हे आवडत नाही, हा असे का बोलतो? असे वाटते. म्हणून याला अतिक्रमण केले असे म्हणतात. आणि अतिक्रमण केले जाते त्याबद्दलच भगवंतांनी प्रतिक्रमण सांगितले आहे. म्हणजे पश्चात्ताप कोणत्या गोष्टींचा करायचा? तर लोकांना जे दु:खदायी होईल अशा गोष्टींबद्दल पश्चात्ताप करा. काय सांगतात? लोकांना जे आवडत असेल त्यासाठी नाही. म्हणून प्रायश्चित्त करावे लागेल. तू करतोस का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** दादा भगवानांच्या नावाने प्रतिक्रमण करतोस की नाही?

**प्रश्नकर्ता :** तुम्ही जे पुस्तक दिले होते ना, त्यात म्हटल्याप्रमाणे करतो. नऊ कलमे करतो.

**दादाश्री :** करतोस ना? ते प्रतिक्रमणच आहे. दादा भगवानांच्या नऊ कलमा दिल्या आहेत ना, ते सर्वात मोठे प्रतिक्रमण आहे. संपूर्ण जगासाठी कल्याणकारी असे ते प्रतिक्रमण आहे.

**प्रश्नकर्ता :** ही गोष्ट खरी आहे का की, पश्चात्तापाच्या घड्यात वाटेल तसे पाप असले तरी...

**दादाश्री :** हलके होऊन जाते, पश्चात्तापामुळे.

**प्रश्नकर्ता :** पूर्णपणे जळून खाक होत नाही का?

**दादाश्री :** पूर्ण जळूनही जाते. अशी कित्येक पापे तर जळूनही जातात, नष्ट होतात. पश्चात्तापाचा साबण असा आहे की बहुतेक सर्व प्रकारच्या कपड्यांवर (दोषांवर) काम करतो.

**प्रश्नकर्ता :** त्यातही जर तुमच्या साक्षीने केले की मग कुठे काय बाकी राहते?

**दादाश्री :** कल्याणच होऊन जाते! या जगात पश्चात्तापाच्या साबणासारखा दुसरा कोणताच साबण नाही.

## पाप-पुण्यापासून निवृत्ती नाही...

**प्रश्नकर्ता :** सर्वसामान्य लोक जाणतात की पाप काय आहे आणि पुण्य काय आहे, तरी पण त्यातून निवृत्त का होऊ शकत नाहीत?

**दादाश्री :** हो, हा प्रश्न दुर्योधनाने कृष्ण भगवंताला विचारला होता की पापाला जाणतो आणि पुण्यालाही जाणतो, अर्थात अधर्म आणि धर्म दोन्हीं जाणतो पण अधर्मापासून निवृत्त होता येत नाही आणि धर्मात प्रवृत्त होत नाही.

**प्रश्नकर्ता :** असे कशामुळे होत नाही?

**दादाश्री :** त्याने अधर्माला जाणलेच नाही. प्रथम हे जाणून घेतले पाहिजे की 'मी कोण आहे?' हे सर्व कशासाठी आहे? माझा भाऊ मला त्रास का देतो? मला दुसरा भाऊ का मिळाला नाही? रोज शिव्या

देत राहतो, असा भाऊ का मिळाला? त्याला तर खूप चांगला भाऊ मिळाला आहे. तर या मागे काय कारण आहे? हे सर्व समजून घ्यावे लागणार की नाही?

**प्रश्नकर्ता :** ते कसे समजून घ्यायचे?

**दादाश्री :** ते सर्व पूर्वजन्माचे आपल्या कर्माचे हिशोब आहेत, यात काही देवाने हस्तक्षेप केलेला नाही. आपापल्या कर्माच्या हिशोबानुसार नफे-तोटे आहेत. त्यात तो अहंकार करतो, त्यामुळे निव्वळ पाप-पुण्येच बांधली जातात. मग ती भोगण्यासाठी जावे लागते. म्हणूनच या गतींमध्ये भटकावे लागत आहे. तुरुंगे आहेत ही सर्व. तुरुंगवास भोगून तो परत येतो आणि पुन्हा जसा होता तसाच्या तसाच. नंतर पुन्हा अहंकार केला नाही तर सुटका होते. म्हणूनच मोक्षाला जायचे असेल तर सुटका करून घे. त्यासाठी 'मी कोण आहे' याचा शोध घेतला आणि ते जाणून घेतले तरच सुटका होईल.

## नफा-नुकसानाचा आधार?

पाच इंद्रियांनी जे जे अनुभवात येते ते सर्वच 'डिस्चार्ज' आहे. हा तर पुण्याच्या आधारे स्वतःच्या इच्छेप्रमाणे होते तेव्हा अहंकार करतो की 'मी केले' आणि नंतर जेव्हा पापाचा उदय येतो तेव्हा नुकसान होते तेव्हा 'देवाने नुकसान केले' असे म्हणतो! नाहीतर म्हणेल माझे ग्रह वाईट आहेत!!! आणि कमाई ही तर सहज कमाई आहे. कुठलाही माणूस कमावू शकत नाही. जर मेहनतीने कमावता येत असते तर मजुरानेच कमावले असते! हे तर तुमचे पुण्य कमावते आणि स्वतः अहंकार करतो की, 'मी कमावले, मी कमावले.' दहा लाख कमावतो तोपर्यंत तो छाती काढून फिरत राहतो आणि जेव्हा पाच लाखाचे नुकसान होते तेव्हा जर आपण त्याला विचारले की, 'शेठ असे का घडले?' तेव्हा सांगतो, 'देव रुसला आहे.' बघा! त्याला दुसरा कोणी सापडला नाही. बिचाऱ्या देवाच्या डोक्यावर खापर फोडतो. तुमच्या मनाप्रमाणे घडते ते पुण्याचे फळ आणि मनाविरुद्ध घडते ते सर्व पापाचे फळ. स्वतःच्या मनाप्रमाणे होईल असे हे जग नाहीच मुळी. आपल्या मनाप्रमाणे

फळ येते तेव्हा ते पुण्याचे प्रारब्ध आहे, आणि मनाप्रमाणे फळ येत नाही तेव्हा ते पापाचे प्रारब्ध आहे.

## अहंकाराने बांधले जाते पुण्य-पाप!

**प्रश्नकर्ता :** जर मला अहंकार पण नसेल आणि ममता पण नसेल, किंवा दोन्हीपैकी एक गोष्ट नसेल, तर मी कोणते कर्म करतो?

**दादाश्री :** अहंकार आहे म्हणून पाप आणि पुण्य होत असतात. अहंकार गेला की पाप-पुण्य गेले. आणि लोक अहंकार कमी करतात ना, तर त्याचे फळ भौतिक सुख मिळते. अहंकार कमी केला त्यामुळे कर्म बांधले गेले. त्याचे फळ भौतिक सुख मिळते. अहंकार अधिक केला त्यामुळे जे कर्म बांधले जाते, त्याचे फळ भौतिक दु:ख मिळते. अहंकार कमी केल्याने काही अहंकार जात नाही, पण तो भौतिक सुख मिळवून देणारा आहे. ज्ञानी असतील तरच अहंकार जातो, अन्यथा अहंकार जात नाही.

काही विशिष्ट मर्यादेपर्यंतच अहंकार कमी होऊ शकतो, त्यामुळे त्याला संसारात अडचण येत नाही. महावीर भगवानांच्या आज्ञेत राहिले तर काही विशिष्ट मर्यादेपर्यंत अहंकार नक्कीच कमी होऊ शकतो पण नॉर्मल अहंकार राहतो. नॉर्मल अहंकार असेल तर संसारात क्लेश होत नाहीत. घरात जरासुद्धा क्लेश किंवा अंतरक्लेश होत नाहीत. असे अजूनही आपल्या क्रमिकमार्गात आहे. पण तेही एखाद्यालाच असेल. फार कमी लोकांना क्लेश होत नाही, अंतरक्लेश होत नाही. परंतु मोक्ष प्राप्तीसाठी तर तो अहंकार सुद्धा काढावा लागेल.

आणि जर तो अहंकार गेला व 'मी' जे आहे त्याचे रियलाइजेशन (भान) झाले की मग झाले! त्यानंतर मग कर्मे बांधली जात नाहीत. मग तो जज असेल तरीही कर्मे बांधली जाणार नाहीत. दानेश्वरी असेल तरीही कर्मे बांधली जाणार नाहीत. साधू असेल तरीही कर्मे बांधली जाणार नाहीत आणि खाटिक असेल तरीही कर्मे बांधले जाणार नाहीत. काय सांगितले मी? असे चकित का झालात? खाटिक म्हटले म्हणून? खाटिकाला विचारले तर तो म्हणेल, साहेब, हा तर वाडवडिलांपासून चालत आलेला व्यवसाय आहे!

**प्रश्नकर्ता :** अहंकार करत असेल तरच पुण्य शब्द वापरला जातो आणि अहंकार करत असेल तरच पाप शब्द वापरला जातो.

**दादाश्री :** ते बरोबर आहे. अहंकार करत असेल तरच पाप-पुण्य शब्द वापरले जातात. पण अहंकार याला जरा बदलतो, दुसरा काही जास्त फरक करत नाही. ही तर घडून गेलेली गोष्ट आहे. ती 'इट हॅपन्स' आहे आणि नवीन पुन्हा तयार होत आहे. नवीन फिल्म तयार होत आहे आणि ही जुनी फिल्म उलगडत आहे.

जोपर्यंत अहंकार आहे तोपर्यंत नवीन चित्रण केल्याशिवाय राहणारच नाही ना! आपण कितीही समजावले तरीही नवीन योजना केल्याशिवाय राहतच नाही ना! अहंकार काय करत नाही? अहंकारानेच तर हे सर्व उत्पन्न झाले आहे. अहंकाराचा जर विलय झाला तर मुक्ती आहे.

## संबंध, पुण्याचा आणि आत्म्याचा...

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचा पुण्याशी काही संबंध आहे का?

**दादाश्री :** काहीही संबंध नाही. परंतु जोपर्यंत अशी 'बिलीफ' (मान्यता) आहे की, 'हे मी करतो' तोपर्यंत संबंध आहे. 'मी करत नाही' ही 'राईट बिलीफ' बसली की मग आत्म्याचा पुण्याशी काहीही संबंध राहत नाही. 'मी दान करतो' 'मी चोरी करतो' हे दोन्हीही 'अहंकार' आहेत. जिथे काहीही करण्यात येते, तिथे पुण्य बांधले जाते किंवा पाप बांधले जाते.

## अज्ञानतेमुळे बांधतो पुण्य कर्म-पाप कर्म!

**प्रश्नकर्ता :** पापाने किंवा पुण्याने किंवा मग या दोन्हींचे मिश्रण झाले, तर कोणत्या योनीत आपला जन्म होतो?

**दादाश्री :** जन्म आणि पाप-पुण्य यांचा काहीही संबंध नाही. जन्म झाल्यानंतर पाप-पुण्य त्याला फळ देतात. योनी कोणत्या आधारावर मिळते? तर 'मी चंदुभाईच आहे आणि हे मी केले' असे बोलल्याबरोबरच योनीत बीज पडले.

हे कर्तापण का राहिले आहे? तर करतो कोणी दुसरा, परशक्ती काम करत आहे आणि स्वतः असे मानतो की 'मी करतो.' परशक्तीचा प्रत्यक्ष पुरावा काय? तर 'या जगात असा कोणी जन्माला आला नाही की ज्याला शौचाला जाण्याची स्वतंत्र शक्ती असेल. ते तर परशक्ती करवून घेते तेव्हा होते.'

आता ही परशक्ती कशाने उत्पन्न झाली? तर जीव अज्ञानदशेत पुण्य आणि पाप ह्या दोनच गोष्टी करू शकतो. तो जे पुण्य-पाप करतो, त्याच्या फळ स्वरूपात कर्माचे उदय येतात. त्या उदयामुळे मग ही कर्मे चिकटतात. 'पुण्य-पाप बांधण्याचे, मूळ कारण काय? ती बांधली जाणार नाहीत यावर काही उपाय आहे का?' तर 'कर्तापण नसेल तर पुण्य-पाप बांधले जात नाहीत.' 'कर्तापण कसे होणार नाही?' तर ''जोपर्यंत अज्ञान आहे, तोपर्यंत 'मी करतो' असे भान आहे. आणि खरोखर 'करतो कोण' हे जर जाणून घेतले तर कर्तापण होणार नाही.'' पुण्य-पापाची जी योजना आहे, ती हे सर्व करत आहे आणि आपण मानतो की 'मी केले.' आपल्याला फायदा तर त्यामुळेच होत असतो. पुण्याच्या आधीन फायदा होतो, तेव्हा आपण मानतो की 'अहाहा! मी कमावले' आणि जेव्हा पापाच्या आधीन होते तेव्हा नुकसान होते, तेव्हा समजते की हे तर माझ्या आधीन नाही. पण मग पुन्हा जेव्हा स्वतःच्या पुण्याच्या आधीन झाले की मग विसरून जातो. म्हणून पुन्हा कर्ता बनतो.

या पाच इन्द्रियांनी जे काही केले जाते, पाच इन्द्रियांनी जे सर्व अनुभवास येते, हे जग जे चालत आहे, ती सगळीच परसत्ता आहे, आणि यात हे लोक म्हणतात, 'हे मी केले.' म्हणजेच तो कर्माचा कर्ता झाला, हीच अधिकरण क्रिया आहे. म्हणून मग भोक्ता व्हावे लागते.

हे कर्तापण कसे मिटेल? तर जोपर्यंत आरोपित भाव आहे तोपर्यंत कर्तापण मिटणारच नाही. स्वतः स्वतःच्या मूळ स्वरूपात आला तरच कर्तापण मिटेल. हे मूळ स्वरूप कसे आहे? तर मूळ स्वरूप 'क्रियाकारी नाही आहे. तो स्वतः क्रियाकारीच नाहीच म्हणून तो कर्ता होतच नाही ना!' परंतु हा तर अज्ञानतेमुळे असेच मानून बसला आहे की 'हे मीच करत आहे.' अशी त्याला बेशुद्धावस्था राहते आणि हाच आरोपितभाव आहे.

## शेवटी तर पाप-पुण्याच्याही पलीकडे जायचे आहे...

पुण्य, हे क्रियेचे फळ आहे, पाप पण क्रियेचे फळ आहे आणि मोक्ष हे 'अक्रियते'चे फळ आहे! जिथे कोणतीही क्रिया आहे, तिथे बंध (कर्मबंधन) आहे. मग तो पुण्याचा असो किंवा पापाचा असो, पण बंधन आहे! आणि 'जाणणे' ही मुक्ती आहे. 'विज्ञान' जाणल्याने मुक्ती आहे. जे जे काही त्याग कराल त्याचे फळ भोगावे लागेल. त्याग करणे ही सत्ता काय आपल्या हातात आहे? आणि ग्रहण करणे ही काय आपली सत्ता आहे? ती सत्ता तर पुण्य-पापाच्या आधीन आहे.

## आत प्रेरक कोण?

आतून जे माहीत होते, इन्फोर्मेशन (सूचना) मिळते ती पुण्य-पाप दाखवते. आत सर्वच ज्ञान-दर्शन आहे. आतूनच सर्व माहिती मिळत असते, पण ती कुठपर्यंत मिळते की जोपर्यंत तुम्ही ती थांबवत नाही तोपर्यंत. त्याचे उल्लंघन केले तर 'इन्फोर्मेशन' येणे बंद होऊन जाईल.

आत्मा परमात्मा स्वरूप आहे. तो चुकीचेही सुचवत नाही आणि खरेही सुचवत नाही. जेव्हा पापाचा उदय येतो तेव्हा चुकीचे सुचते आणि पुण्याचा उदय येतो तेव्हा बरोबर दाखवते. यात आत्मा काहीच करत नाही. आत्मा तर फक्त स्पंदनांना पाहतच राहतो! एकाग्रता तर आतून आपल्या कर्माचा उदय जेव्हा साथ देईल तेव्हा होते. उदयाने साथ दिली नाही तर होणार नाही. पुण्याचा उदय असेल तर एकाग्रता होते, पापाचा उदय असेल तर एकाग्रता होत नाही.

## 'ज्ञानी' निमित्त, आत्मप्राप्तीचे

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला ओळखण्यासाठी निमित्ताची आवश्यकता आहे का?

**दादाश्री :** निमित्ताशिवाय तर काहीच घडत नाही.

**प्रश्नकर्ता :** निमित्त पुण्याने मिळते की पुरुषार्थाने?

**दादाश्री :** पुण्याने. बाकी जर पुरुषार्थ केला, या उपाश्रयातून त्या उपाश्रयात धावाधाव करत राहिला, असे अनंत जन्म भटकत राहिला तरीही निमित्त प्राप्त होत नाही आणि जर आपले पुण्य असेल तर सहज, रस्त्यात निमित्त भेटतील. त्यासाठी पुण्यानुबंधी पुण्य पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी पुरुष' कोणत्या पुण्याच्या आधारावर भेटतात?

**दादाश्री :** पुण्यानुबंधी पुण्याच्या आधारावर! हे एकच साधन असे आहे की ज्याच्यामुळे माझी भेट होईल. कोटी जन्मांचे पुण्य जागे होते तेव्हा या ज्ञानी पुरुषाचा योग जुळून येतो.

## पुण्यरुपी साथ मोक्षाची...

**प्रश्नकर्ता :** पुण्याचे भाव आत्मार्थासाठी हितकारी आहेत का?

**दादाश्री :** पुण्य आत्म्यासाठी हितकारी आहे ते यासाठी की हे पुण्य असेल तर इथे सत्संगात ज्ञानी पुरुषांजवळ येऊ शकतो ना! नाहीतर या मजुरांना पाप आहे, म्हणून ते बिचारे इथे कसे येऊ शकतील? दिवसभर कष्ट करतात तेव्हा कुठे संध्याकाळी खाण्यासाठी पैसे मिळतात. या पुण्यामुळेच तर तुम्हाला घर बसल्या खायला मिळते आणि थोडाफार वेळसुद्धा मिळतो. म्हणजेच पुण्य तर आत्मार्थासाठी हितकारी आहे. पुण्य असेल तर सवड मिळते. तुम्हाला असे संयोग जुळून येतात, कमी कष्टाने पैसे मिळतात, शिवाय पुण्य असेल तर दुसरी पुण्यशाली माणसेही भेटतात, नाहीतर नालायक माणसे भेटतात.

**प्रश्नकर्ता :** आत्म्यासाठी हे जास्त हितकारी आहे का?

**दादाश्री :** जास्त हितकारी नाही, पण त्याची आवश्यकता तर आहेच ना?

कधीतरी 'एक्सेप्शनल' (अपवादात्मक) केसमध्ये पाप असेल तर ते खूप हितकारी ठरते पण ते पुण्यानुबंधी पाप असले पाहिजे. पुण्यानुबंधी पाप असेल तर ते जास्त हितकारी ठरते.

## पाप-पुण्य, दोन्हीही भ्रांती?

**प्रश्नकर्ता :** पुण्यशालीला सगळे 'या या, बसा.' असे म्हणतात, तर त्यामुळे त्याचा अहम् वाढणार नाही का?

**दादाश्री :** असे आहे की, ही गोष्ट ज्याला 'ज्ञान' आहे त्याच्यासाठी नाही. ही तर संसारी गोष्ट आहे, ज्याच्याजवळ 'ज्ञान' आहे त्यांना तर पुण्यही राहिले नाही आणि पापही राहिले नाही! त्याला तर दोन्हींचा 'निकाल' करणेच बाकी आहे. कारण पुण्य आणि पाप दोन्हीही भ्रांतीच आहेत. परंतु जगाने त्याला खूप किमती मानले आहे! म्हणजे हे तर आपण जगातील लोकांबद्दल बोलत आहोत. पण या जगात लोक विनाकारण तडफडत आहेत.

## अधिक पुण्याने अहंकार वाढतो...

असे आहे की हे कलियुग आहे, यात ज्या इच्छा होतात आणि त्या इच्छा जर पूर्ण झाल्या तर त्याचा अहंकार वाढतो. मग गाडी उलट दिशेनेच चालते. म्हणूनच या कलियुगात ठोकर बसणे हे तर चांगलेच आहे. अर्थात प्रत्येक युगात हे वाक्य वेगवेगळ्या प्रकारे असते. म्हणून या युगाला अनुसरून असे म्हटले जाते. आता जर इच्छेनुसार मिळाले तर त्याचा अहंकार वाढतो. मिळते ते सर्व पुण्याच्या हिशोबाने आणि वाढतो मात्र काय? तर अहंकार, 'मी आहे.' म्हणूनच जितक्या इच्छा होतात, त्याप्रमाणे घडत नाही तेव्हा त्याचा अहंकार जागेवर राहतो आणि त्याला ह्या गोष्टी समजू लागतात. ठोकर लागते तेव्हाच समजते, त्याशिवाय समजतच नाही ना! इच्छा झाली आणि मिळाले म्हणूनच तर हे लोक डोक्यावर चढले. इच्छेनुसार मिळाले म्हणून तर अशी अवस्था झाली या बिचाऱ्यांची! जे पुण्य होते ते सर्व तर खर्च झाले आणि उलट अडकत गेले आणि अहंकार गाढ होत गेला! अहंकार वाढण्यास वेळ लागत नाही. फळ कोण देत असते? पुण्य देते आणि मनात काय मानतो की, 'मीच करतो.' अशा अहंकारीला तर मार बसलेलाच चांगला. इच्छा झाली आणि लगेच मिळाले तर तो घरात पाय जमिनीवर ठेवतच नाही. बापालाही जुमानत नाही. कोणाचेही ऐकत

नाही. म्हणूनच इच्छा झाली आणि ते मिळाले तर समजायचे की अधोगतीत जाणार आहे, त्याची बुद्धी वाढत जाऊन तो चक्रम होऊन जातो. सध्या थोड्याफार लोकांना इच्छेनुसार मिळाले आहे, ते तर आता लाखोंच्या फ्लॅटमध्ये राहतात आणि त्या सर्वांची जनावरांसारखी दैना झाली आहे. फ्लॅट असेल लाखांचा पण तो त्यांच्यासाठी हितकारी ठरत नाही, म्हणजे ही तर त्यांच्यावर दया करण्यासारखी स्थिती आहे.

## पुण्याने पण वाढतो संसार...

**प्रश्नकर्ता :** पुण्याच्या बंधनाने संसार तर वाढतो, असा त्याचा भावार्थ होतो ना?

**दादाश्री :** पुण्य असे हितकारी नाही. पुण्य तर एक प्रकारे हेल्प करते. पाप असेल तर ज्ञानी पुरुष भेटतच नाहीत. ज्ञानी पुरुषांना भेटायचे असेल पण दिवसभर मिलमध्ये नोकरी करत असेल तो कसा भेटू शकेल? म्हणजे अशा प्रकारे पुण्य हेल्प करते आणि तेही पुण्यानुबंधी पुण्य असेल तरच हेल्प करते.

**प्रश्नकर्ता :** जसे पापाने संसार वाढतो तसे पुण्याने पण संसार वाढतो ना?

**दादाश्री :** पुण्याने पण संसार वाढतो, पण इथून जे मोक्षाला गेले आहेत ना, ते जबरदस्त पुण्यशाली होते. त्यांच्या आजूबाजूला राण्या बघितल्या तर दोनशे-पाचशे तर राण्या असायच्या आणि राज्यही खूप मोठे असायचे. स्वत:ला हे माहितही नसायचे की केव्हा सूर्यनारायण उगवले आणि केव्हा मावळले, अशा थाटामाटात तर पुण्यशाली जन्माला येतात! खूप साऱ्या राण्या असतात, ऐश्वर्य असूनही ते कंटाळून जायचे की या संसारात सुख तरी काय आहे? पाचशे राण्यांमधून पन्नास राण्या त्यांच्यावर खुश असायच्या. बाकीच्या तोंड फुगवून फिरत असायच्या, कित्येक राण्या तर राजाला मारून टाकण्याच्या प्रयत्नात असायच्या. अर्थात हे जग तर अतिशय कठीण आहे. यातून मुक्त होणे हे खूप कठीण आहे. ज्ञानी पुरुष भेटले तर ते एकमेव आपली मुक्ती करवून

देतात, बाकी इतर कुणीही मुक्त करू शकत नाही. ज्ञानी पुरुष मुक्त झालेले आहेत, म्हणून आपली मुक्तता करू शकतात. ते तरणतारण झालेले आहेत, म्हणून ते सोडवू शकतात.

## हत्पुण्यशाली ज्ञानींना भेटू शकत नाही

**प्रश्नकर्ता :** आम्ही पुष्कळ लोकांना समजावतो की 'दादां'जवळ या, पण ते येत नाहीत.

**दादाश्री :** पण येणे सोपे नाही. त्यासाठी तर खूप पुण्य पाहिजे. जबरदस्त पुण्य असेल तेव्हाच भेट होऊ शकते. पुण्याशिवाय कसा भेटू शकेल? तुम्ही किती पुण्य केले होते तेव्हा मला भेटू शकलात. त्यांचे पुण्य कमी पडते त्यामुळे ते अजून मला भेटू शकत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** लोकांचे पुण्य केव्हा जागे होईल? कारण निमित्त तर उत्कृष्ट आहे.

**दादाश्री :** हो. पण पुण्य जागे होणे ही काही इतकी सोपी गोष्ट नाही ना. पुण्यशाली असतील, तर पुण्य जागे झाल्याशिवाय राहणार नाही. अजूनही जे पुण्यशाली असतील, त्यांचे पुण्य जागे होईलच.

## अक्रम मार्गातील लॉटरीचे विजेता...

या पुण्यानुबंधी पुण्यशालींसाठीच तर असा मार्ग निघतो ना! प्रत्यक्षाशिवाय काहीच शक्य नाही. 'वीतराग विज्ञान' प्रत्यक्ष ज्ञानींशिवाय कामी येईल असे नाही. आणि हे तर 'अक्रम-विज्ञान, ह्यात तर कॅश डिपार्टमेंट (रोकड खाते) कॅश बँक (रोकड बँक) आणि क्रमिकमध्ये तर त्याग करतात, पण कॅश फळ मिळत नाही, आणि यात तर कॅश फळ!

असे ज्ञान या साडे तीन अब्जातील वस्तीत कोणाला नको असेल? सर्वांनाच हवे आहे. पण हे ज्ञान सगळ्यांसाठी नसते. हे तर महापुण्यशालींसाठी असते. हे 'अक्रम विज्ञान' प्रकट झाले आहे, यात लोकांचे काही पुण्य तर असेलच ना! एकमात्र भगवंतावरच आश्रय

ठेवून भटकणाऱ्या भक्तांसाठी आणि ज्यांचे पुण्य असेल अशा लोकांसाठी 'हा' मार्ग निघाला आहे. हे तर खूप पुण्यशालींसाठी आहे आणि जे इथे सहजच येऊन पोहोचतात व खऱ्या भावनेने मागतात त्यांना आम्ही ज्ञान देतो. पण लोकांना यासाठी सांगायला जायचे नसते. ह्या 'दादांच्या' आणि त्यांच्या महात्म्यांच्या हवेनेच जगाचे कल्याण होऊन जाईल. मी निमित्त आहे, कर्ता नाही. इथे ज्यांना भावना झाली आणि त्यांनी जर 'दादां'चे दर्शन घेतले, तर ते दर्शन थेटपर्यंत पोहोचते. 'दादा' तर या देहाच्या जवळच्या शेजाऱ्यासारखे राहतात, आणि हे जे बोलत आहे ती तर रेकॉर्ड आहे. हे 'अक्रम ज्ञान' तर काही लोकांसाठीच, खूप पुण्यशाली असतील त्यांच्यासाठी आहे, इथे तर जे 'सहजच' येतात आणि सोबत स्वतःच्या पुण्याचा पासपोर्ट घेऊन येतात, त्यांना आम्ही ज्ञान देतो. ज्याने 'दादां'ची कृपा मिळवली त्याचे तर (मोक्षाचे) कामच झाले!

इथे आलेली सर्व माणसे स्वतःबरोबर किती चांगले पुण्य घेऊन आली आहेत! 'दादां'च्या लिफ्टमध्ये बसून मोक्षाला जायचे. कोटी जन्मांची पुण्याई जमा होते तेव्हाच तर 'दादा' भेटतात! आणि त्यानंतर जरी कितीही डिप्रेशन (नैराश्य) असेल तरी तो निघून जाईल. सगळीकडून फसलेल्यांसाठी 'हे' स्थान आहे. आपल्या इथे तर क्रॉनिक (जुने) रोग सुद्धा बरे झाले आहेत.

## विश्वात अब्जपती किती?

एक महाराज तिथे आले होते, तेव्हा तिथे लाखो माणसे गोळा झाली होती. आणि आपल्या इथे तर दोनशे-तीनशे माणसेच गोळा झाली. शेवटच्या स्टेशनची तिकीट कोण काढतो? तसे लोक फार कमी असतात आणि मधल्या स्टेशनची तिकिटे तर सर्वच काढतात. तेव्हा एका माणसाने मला विचारले, 'असे का?' मी म्हणालो, 'संपूर्ण जगात अब्जपतींचे नाव मोजण्यात आले तर ते किती असतील?' तेव्हा तो म्हणाला, 'ते तर खूप थोडे (कमी) असतील.' मी म्हणालो, 'आणि सामान्य माणसे?' तेव्हा म्हणाला, 'ती तर खूपच असतील.' म्हणजे जे धर्मात महापुण्यशाली असतील तेच मला भेटतात, आणि पैशांचे पुण्याशाली

असतील ते तर अब्जपती असतात आणि हे तर अब्जपतीपेक्षाही अधिक उच्च कोटीचे पुण्य आहे! असे तर खूपच कमी असतात.

पुण्यानुबंधी पुण्य ज्ञानी पुरुषांशी भेट घडवून देते! पुण्यानुबंधी पुण्य कशाला म्हटले जाते? की ज्यांना 'दादा भगवान' भेटतात. करोडो जन्मात देखील भेटणार नाहीत असे 'दादा', की जे आपल्याला एका तासातच मोक्ष देतात. मोक्षाचे सुख चाखवतात, अनुभूती करवितात, असे दादा भगवान क्वचितच कधी भेटतात, मलाही भेटले आणि तुम्हालाही भेटले, बघा ना!

**प्रश्नकर्ता :** आम्ही कुठे काय कमावून आणले आहे? ही तर आपली कृपा आहे.

**दादाश्री :** पुण्य म्हणजे काय की तुम्ही मला भेटलात तो तुमच्याजवळ काही हिशोब होता त्या आधारावरच! नाही तर माझ्याशी भेट होणे खूप कठीण आहे. म्हणजेच भेट होणे, हे एक प्रकारचे तुमचे पुण्य आहे आणि भेटल्यानंतर इथे वळले, टिकून राहिले, तर मात्र खूप मोठी गोष्ट आहे.

## पुण्यासोबत हवी कषाय मंदता!

**प्रश्नकर्ता :** समकितसाठी काही प्रयत्न करण्याची आवश्यकता नाही का?

**दादाश्री :** नाही, प्रयत्न तर आपोआपच, सहज प्रयत्न व्हायला हवेत. इथे तर लोक शेती नांगरतात, पुढील येणाऱ्या जन्मी फळ मिळावे म्हणून. समकितमध्ये तर फळरहित असले पाहिजे. हे तर जप-तप इत्यादी जे काही करतात ना, त्यामुळे पुण्य बांधले जाते आणि मग त्याचे फळ मिळते.

**प्रश्नकर्ता :** त्याचे जे काही पण फळ मिळेल तर ते समकित रूपातच मिळाले पाहिजे ना?

**दादाश्री :** नाही, नाही. समकितला आणि ह्याला काही देणेघेणे

नाही. ती सर्व भौतिक फळे मिळतात, देवगती मिळते. आणि समकित ही तर वेगळीच गोष्ट आहे.

## हे तीन नियम पुण्यानुबंधी पुण्याचे!

समकित प्राप्तीसाठी पुण्यानुबंधी पुण्य पाहिजे. मोह तुटला पाहिजे, क्रोध-मान-माया-लोभ कमी झाले पाहिजेत. तर तो समकितकडे वळेल. नाहीतर समकित होईलच कसे? या लोकांच्या तर क्रोध-मान-माया-लोभ वाढतील अशा क्रिया आहेत सर्व.

**प्रश्नकर्ता :** क्रोध-मान-माया-लोभ कशा प्रकारे कमी होतात आणि पुण्यानुबंधी पुण्य कशा प्रकारे बांधले जाते?

**दादाश्री :** आपली इच्छा केवळ मोक्षाला जाण्याचीच असली पाहिजे आणि या इच्छेसाठी जे जे काही करण्यात येते ती क्रिया पुण्यानुबंधी पुण्यकर्म बांधते. कारण हेतू मोक्षप्राप्तीचा आहे ना, म्हणून.

मग स्वत:जवळ जे असेल ते परक्यांसाठी लुटवतात! याला जीवन जगता आले असे म्हणतात. वेडे म्हणून नाही तर समंजसपणे परक्यांसाठी लुटवतात. वेड्यासारखा दारू पीत असेल त्याने कधी भले होत नाही. जे कधीही व्यसन करत नाहीत आणि स्वत:जवळचे दुसऱ्यांसाठी वापरतात, त्याला पुण्यानुबंधी पुण्य म्हणतात.

याहून पुढचे पुण्यानुबंधी पुण्य कोणते? कुठल्याही क्रियेत मोबदल्याची इच्छा ठेवत नाही, समोरच्या व्यक्तीला सुख देते वेळी त्याच्या बदल्यात कुठल्याही प्रकारची इच्छा, अपेक्षा ठेवत नाही, ते आहे पुण्यानुबंधी पुण्य!

## ज्ञानच सोडवते भटकंतीपासून

लोकांनी जे जाणले आहे ते लौकिक ज्ञान आहे. खरे ज्ञान तर वास्तविक असते आणि जे वास्तविक ज्ञान असते ते कोणत्याही प्रकारची अशांती होऊ देत नाही. आत कुठल्याही प्रकारचे पझल (कोडे) निर्माण होऊ देत नाही. या भ्रांतीज्ञानाने तर नुसती कोडीच उभी रहातात. आणि

ही कोडी कधी सुटतही नाहीत. गोष्ट खरी आहे, पण ती समजली पाहिजे ना? यथार्थपणे समजल्याशिवाय कधीच उलगडा होणार नाही. पूर्णपणे नीट समजली पाहिजे. नीट समजण्यासाठी पापे धुवावी लागतात. पापे धुतली जात नाहीत तोपर्यंत काहीही निष्पन्न होत नाही. ही सर्व पापेच गोंधळ उडवतात. पापरूपी आणि पुण्यरूपी जो अडथळा आहे, तोच माणसाला गोंधळात टाकतो!

अनंत जन्मांपासून सतत भटकत राहून या भौतिक सुखांच्या मागेच लागून राहिलो आहोत. या भौतिक सुखाने अंतरशांती होत नाही. पैशाचे अंथरूण अंथरले तर काय झोप लागते? ही तर स्वत:ची अनंत शक्ती वाया गेली!

ज्ञानी पुरुष पापे धुऊन टाकतात. श्रीकृष्णाने गीतेत सांगितले आहे, ज्ञानी पुरुष पापाचे गाठोडे बांधून नष्ट करून टाकतात. ही पापे जेव्हा नष्ट होतात तेव्हा आत्मा प्रकट होतो, नाही तर इतर कोणत्याही प्रकारे आत्मा प्रकट होत नाही. स्वत:च पापांना नष्ट कसे करू शकेल? नवीन पुण्य बांधू शकतो, पण जुन्या पापांना नष्ट करू शकत नाही. ज्ञानी पुरुषांचे ज्ञानच पापांना नष्ट करून टाकते.

बाकी तर, पुण्य आणि पाप, पाप आणि पुण्य यांच्या अनुबंधातच मनुष्य भटकत राहतो. यातून त्याला कधीही मुक्ती मिळत नाही. खूप पुण्य केले असेल तर जास्तीत जास्त देवगती मिळू शकते पण मोक्ष तर मिळूच शकत नाही. मोक्ष तर जेव्हा ज्ञानी पुरुष भेटतात आणि तुमच्या अनंत काळाच्या पापांना जाळून भस्मीभूत करून तुमच्या हातात शुद्ध आत्मा देतात तेव्हा होतो. तोपर्यंत चौऱ्यांशी लाख योनीत भटकतच राहायचे.

'आम्ही' ज्ञान देतो तेव्हा चित्त शुद्ध करून देतो. पापांचा नाश करून देतो आणि दिव्यचक्षु देतो, सर्व प्रकारे त्याच्या आत्म्याला आणि अनात्म्याला वेगळे करून देतो!

## व्हिसा, महाविदेह क्षेत्राचा!

**प्रश्नकर्ता :** महाविदेह क्षेत्रात कशा प्रकारे जाऊ शकतो? पुण्याने?

**दादाश्री :** हे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर आमच्या पाच आज्ञा पाळतो, त्यामुळे या जन्मात पुण्य बांधलेच जात आहे, ते पुण्य महाविदेह क्षेत्रात घेऊन जाते. आज्ञा पाळल्याने धर्मध्यान उत्पन्न होते. ते सर्व फळ देईल. आपल्याला मोक्षाला जायचे आहे. त्यासाठी मोक्षाला जाऊ शकू एवढे पुण्य पाहिजे. इथे तुम्ही सीमंधर स्वामींची जेवढे (भक्ती-आराधना वगैरे) कराल, तेवढे सर्व तुमचे आले.

तुम्ही सीमंधर स्वामींचे नाव तर ऐकले आहे ना? सध्या ते तीर्थंकर आहेत, महाविदेह क्षेत्रात आज त्यांची उपस्थिती आहे.

सीमंधर स्वामींचे वय किती ६०-७० वर्षांचे असेल का? पावणे दोन लाख वर्षांचे वय आहे! अजून सव्वा लाख वर्ष जगणार आहेत! त्यांच्याबरोबर तार जोडून देत आहे. कारण तिथे जायचे आहे. इथून सरळ मोक्ष होणार नाही. अजून एक जन्म बाकी राहील. त्यांच्याजवळ बसायचे आहे म्हणून तार जोडून देतो.

आणि हे भगवंत संपूर्ण जगाचे कल्याण करतील. संपूर्ण जगाचे कल्याण होईल त्यांच्या निमित्ताने. कारण ते जिवंत आहेत. जे मोक्षाला गेले आहेत ते काहीच करू शकत नाहीत, त्यांच्या भक्तीने फक्त पुण्य बांधले जाते, जे संसार फळ देते!

## तिथे पुण्य आणि पाप, दोन्हीही निकाली...

धर्म दोन प्रकारचे आहे. एक स्वाभाविक धर्म, त्याला रियल धर्म म्हणतात. आणि दुसरा विभाविक धर्म, त्याला रिलेटिव्ह धर्म म्हणतात. जेव्हा 'शुद्धात्मा' प्राप्त होतो तेव्हा स्वाभाविक धर्मात येतो. स्वाभाविक धर्म हाच खरा धर्म आहे. या धर्मात चांगले-वाईट असे काही निवडायचे नसतेच. विभाविक धर्मात सर्व निवडायचे असते.

दान देणे, लोकांवर उपकार करणे, ऑब्लाइजिंग नेचर (परोपकारी स्वभाव) ठेवणे, लोकांची सेवा करणे, या सगळ्यांना रिलेटिव्ह धर्म म्हटले आहे. त्यामुळे पुण्य बांधले जाते. आणि शिव्या दिल्याने, मारामारी केल्याने, लुटून घेतल्याने पापकर्म बांधले जाते. जिथे पुण्य आणि पाप

आहे तिथे रियल धर्मच नाही. रियल धर्म पुण्य-पापरहित आहे. जिथे पुण्य-पापाला हेय (त्याग करण्या योग्य) मानले जाते. आणि स्वतःचे आत्मस्वरूप उपादेय (ग्रहण करण्या योग्य) मानले जाते तिथे रियल धर्म आहे. अशा प्रकारे 'हे रियल' आणि 'रिलेटिव्ह' दोन्ही धर्म वेगळे आहेत.

जोपर्यंत 'मी कोण आहे' हे जाणत नाही तोपर्यंत पुण्य उपादेय रूपातच असते आणि पाप हेय रूपात असते. पुण्य आणि पाप हेय झाले, तिथे समकित! भगवंतांनी म्हटले आहे की पाप-पुण्य या दोन्हींवर ज्याला द्वेष किंवा राग नाही तो 'वीतराग' आहे!

- **जय सच्चिदानंद**

# नमस्कार विधी

● प्रत्यक्ष 'दादा भगवान' यांच्या साक्षीने, वर्तमानात महाविदेह क्षेत्रात विचरत असणारे तीर्थंकर भगवान श्री सीमंधर स्वामींना अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (४0)

● प्रत्यक्ष 'दादा भगवान'यांच्या साक्षीने, वर्तमानात महाविदेह क्षेत्रात तसेच अन्य क्षेत्रात विचरत असणारे ॐ परमेष्टी भगवंतांना अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (५)

● प्रत्यक्ष 'दादा भगवान' यांच्या साक्षीने, वर्तमानात महाविदेह क्षेत्रात तसेच अन्य क्षेत्रात विचरत असणारे पंच परमेष्टी भगवंतांना अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (५)

● प्रत्यक्ष 'दादा भगवान' यांच्या साक्षीने, वर्तमानात महाविदेह क्षेत्रात तसेच अन्य क्षेत्रात विहरमान तीर्थंकर साहेबांना अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (५)

● वीतराग शासन देवी-देवतांना अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (५)

● निष्पक्षपाती शासन देवी-देवतांना अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (५)

● चोवीस तीर्थंकर भगवंतांना अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (५)

● श्रीकृष्ण भगवंतांना अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे.(५)

● भरतक्षेत्रात सध्या विचरत असणारे सर्वज्ञ श्री दादा भगवानांना निश्चयाने अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (५)

● दादा भगवानांच्या सर्व समकितधारी महात्म्यांना अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (५)

● संपूर्ण ब्रह्मांडातील जीवमात्रांच्या रियल स्वरूपाला अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करीत आहे. (५)

- रियल स्वरूप हे भगवत् स्वरूप आहे, म्हणून संपूर्ण जगाचे भगवत् स्वरूपात दर्शन करीत आहे. (५)

- रियल स्वरूप हे शुद्धात्मा स्वरूप आहे, म्हणून संपूर्ण जगाचे शुद्धात्मा स्वरूपात दर्शन करीत आहे. (५)

- रियल स्वरूप हे तत्व स्वरूप आहे, म्हणून संपूर्ण जगाचे तत्वज्ञानाने दर्शन करीत आहे. (५)

**( वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामींना परम पूज्य श्री दादा भगवानांच्या माध्यमातून प्रत्यक्ष नमस्कार पोहोचतात. कंसात लिहिलेल्या संख्येनुसार तेवढ्या वेळा दररोज बोलावे. )**



## प्रतिक्रमण विधी

प्रत्यक्ष 'दादा भगवानांच्या' साक्षीने देहधारी...... ( ज्याच्या प्रती दोष झाला असेल त्या व्यक्तीचे नाव ) च्या मन-वचन-कायेचे योग, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्माहून भिन्न असे हे शुद्धात्मा भगवान! आपल्या साक्षीने, आजच्या दिवसापर्यंत माझ्याकडून जे जे ★★ दोष झाले आहेत, त्यांची क्षमा मागत आहे, हृदयपूर्वक खूप पश्चात्ताप करीत आहे. मला क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा. आणि पुन्हा असे दोष कधीही करणार नाही, असा दृढ निश्चय करीत आहे, त्यासाठी मला परम शक्ती द्या.

★★( आयुष्यभरात क्रोध-मान-माया-लोभ, विषय-विकार, कषाय इत्यादीपासून त्या व्यक्तीला जे जे दुःख दिले गेले असेल, त्या सर्व दोषांना मनात आठवावे. )

## दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तके

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं, ग्रंथ)
10. भावना सुधारे जन्मोजन्म
11. कर्माचे विज्ञान
12. पाप-पुण्य
13. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
14. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
15. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
16. मानव धर्म
17. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
18. सेवा-परोपकार
19. दान
20. त्रिमंत्र
21. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
22. चमत्कार
23. सत्य-असत्याचे रहस्य
24. वाणी, व्यवहारात (सं)
25. पैशांचा व्यवहार (सं)
26. क्लेश रहित जीवन
27. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
28. प्रेम
29. गुरू-शिष्य
30. अहिंसा
31. आप्तवाणी - 1 ते 6
36. आत्मसाक्षात्कार
37. जगत् कर्ता कोण ?
38. कर्माचा सिद्धांत

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1 से 3)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

★ **दादा भगवान फाउन्डेशनद्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेतसुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहेत. वेबसाइट www.dadabhagwan.org वरसुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता.**

★ **प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि इंग्रजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित होत आहे.**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन** : +91 79 3500 2100, +91 9328661166/77
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | 9810098564 | **बेंगलूर** | 9590979099 |
| **कोलकता** | 9830093230 | **हैदराबाद** | 9885058771 |
| **चेन्नई** | 7200740000 | **पूणे** | 7218473468 |
| **जयपुर** | 8890357990 | **जलंधर** | 9814063043 |
| **भोपाल** | 6354602399 | **चंडीगढ** | 9780732237 |
| **इन्दौर** | 6354602400 | **कानपुर** | 9452525981 |
| **रायपुर** | 9329644433 | **सांगली** | 9423870798 |
| **पटना** | 7352723132 | **भुवनेश्वर** | 8763073111 |
| **अमरावती** | 9422915064 | **वाराणसी** | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 759-92-DADA (3232)

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 402179706

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 91457800

**www.dadabhagwan.org**



## मोक्ष हेतू, पुण्यानुबंधी पुण्य

समकित प्राप्तीसाठी पुण्यानुबंधी पुण्य पाहिजे. क्रोध-मान-माया-लोभ कमी झाले पाहिजेत. तर तो समकितकडे वळेल. आपली इच्छा केवळ मोक्षाला जाण्याचीच असली पाहिजे आणि या इच्छेसाठी जे जे काही करण्यात येते ती क्रिया पुण्यानुबंधी पुण्यकर्म बांधते. कारण हेतू मोक्षप्राप्तीचा आहे ना, म्हणून.

मग स्वत:जवळ जे आले असेल ते परक्यांसाठी लुटवतात! परक्यांसाठी लुटवतात याला पुण्यानुबंधी पुण्य म्हणतात. कुठल्याही क्रियेत मोबदल्याची इच्छा ठेवत नाही, समोरच्या व्यक्तीला सुख देते वेळी त्याच्या बदल्यात कुठल्याही प्रकारची इच्छा ठेवत नाही, याचे नाव पुण्यानुबंधी पुण्य!

\- दादाश्री



dadabhagwan.org



Printed in India

Price ₹40